# वेल विस्तार

( कथासंग्रह )

महादेवशास्त्री जोशी

बा. द. सातोस्कर, बी. ए.

मुंबई १९४१

ज्यांच्या मधुर स्मृति माझ्या मनःफलकावरून कधींहि
पुसल्या जाणें नाहींत असे माझे प्रेमळ आप्त

**कै. दत्तूकाका जोशी**

यांच्या दिवंगत आत्म्यास

---

निरनिराळ्या मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या या गोष्टी पुनश्च पुस्तकरूपानें प्रकाशित होण्याचा योग आला याबद्दल मला आनंद वाटणे स्वाभाविक आहे. मात्र या आनदात, आपण महाराष्ट्रशारदेच्या अंगावर एक मोलाचा अलंकार चढवला हा अभिनिवेश मुळीच नाहीं.

या संग्रहातील 'उर्मिला' वगळून बाकीच्या सगळ्या कथा गोमतकाच्या पार्श्वभूमीवर आधारलेल्या आहेत. स्थळ, काळ आणि व्यक्तींचीं काही नावे यांच्या अपरिचितपणामुळें हा संग्रह प्रादेशिक वाटत असला तरी त्यांतल्या भावना सार्वत्रिक अतएव सर्वांच्या ओळखीच्या आहेत.

हर्ष, शोक, प्रणय, क्रोध या भावना सगळीकडे सारख्याच असल्या तरी मनुष्याच्या मनावरचे संस्कार आणि भोवतालची परिस्थिति याच्यामुळे त्याचा आविष्कार मात्र विविध रूपानीं झालेला पहायला मिळतो. प्रादेशिक कथा ज्या ठराविकाहून थोड्याशा निराळ्या वाटतात त्या नवीन वातावरण आणि नव्या धर्तीचा भावनाविष्कार याच्यामुळेच.

त्या दृष्टीनें माझा हा प्रयत्न कितपत साध्य झाला आहे ते ठरवण्याचे काम चोखंदळ वाचक करतीलच.

नव्या लेखकाचे नवें पुस्तक प्रकाशित करणें हें थोडें धाडसाचेंच काम असतें. त्यांतून हा लढाईचा काळ. अशा स्थितींत हे धाडस पत्करून माझे मित्र श्री. बा. द. सातोस्कर यानीं माझ्या गोष्टी प्रकाशित केल्या याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. हे साहस त्याच्या अंगाशीं न येवो अशी अपेक्षा करतों. मुखपृष्ठावरचें सुदर चित्र काढून दिल्याद्दल चित्रकार श्री. कामत याचा मी आभारी आहे.

पुस्तकांत मुद्रणदोष राहून गेले आहेत. त्याबद्दल वाचकवर्ग क्षमा करील अशी आशा आहे.

रसिकाचा नम्र,

ता. ३-६-४१ महादेवशास्त्री जोशी.

# बिल्वर

'आम्ही दोघी मैत्रिणी जोडीच्या
हातांत पाटल्या तोडीच्या
फु: फु: फु: —'

फुगडी ऐन रंगात आली होती. दोघी समवयस्क तरुणी फुगडी खेळत होत्या. तोंडानें चाललेल्या 'फु: फु:'च्या तालावर त्यांचा ठेकेबंद पदविन्यास होत होता. दोघींचाहि वर्ण गौर होता. त्यांच्या साड्याहि रंगसंगतीच्या दृष्टीनें त्यांना खुलून दिसत होत्या. फुगडी खेळण्याच्या श्रमानें त्यांचे कपोलहि यावेळीं लालसर झाले होते. एकमेकींच्या हातात हात गुंफून शक्य तितकी ओढ घेऊन चक्राकार फिरत असतांना, दोघींचाहि पदर पाठीमागें वाऱ्यानें फडफडत होता. श्वासोच्छ्वास जोरानें चालल्यामुळें त्यांचा उरोभाग तितक्याच जोरानें खालींवर होई तोहि मोठा प्रेक्षणीय वाटे. त्यांनीं जरी आपल्या साड्या चापून चोपून बसवल्या होत्या तरी खेळतां खेळतां चटकन् केव्हांतरी त्यांच्या पायांच्या गोऱ्यापान पोटऱ्या उघड्या होत नी पुन्हा वस्त्राआड लपत तो लपंडावहि नयनवेधक होता. त्यांनीं आंबाड्यांत माळलेल्या फुलांच्या नाजूक वेण्या या वेळीं केशबंधनांतून अर्धवट सुटून खालीं लोंबकळत होत्या. त्यांची सुद्धां त्यांना जाणीव नव्हती. खरोखर भान विसरून त्या खेळत होत्या.

त्यांच्या तल्लीनतेनें सभोंवतीं बसलेल्या स्त्रीजनांनाहि तल्लीन करून टाकलें होतें.

गांवांतल्या एका धनिक अन् हौशी गृहस्थाच्या घरीं मंगळागौरीचा समारंभ होता. नवी सून अन् त्यांतून पहिला वहिला मंगळवार. त्यामुळें मालकीणबाईंनीं चांगल्या थाटामाटानें मंगळागौर करायचें ठरवलें होतें. मंगळागौर बसवणाऱ्या मुलीच आठदहा होत्या. सकाळपासून त्यांची गोड किलबिल सारखी चालू होती त्या घरांत. एखाद्या आम्र-वृक्षावर चारहि दिशांनीं खूपशीं पाखरें जमून त्यांनीं आपल्या कूजि-तांनीं तो वृक्ष सशब्द करून टाकावा, म्हणजे त्याच्याखालीं विसाव्या-साठीं टेकलेल्या पांथस्थाला जसें देवलोकींच्या उद्यानांत बसल्यासारखें वाटतें तसेंच त्या घरांतल्या मंडळींस वाटत होतें.

मुलींनीं मोठ्या उत्साहानें मंगळागौर सजवली होती. आंतली देवीची मूर्ति केवढी असेल तें एक तिलाच माहीत. पण त्यांनीं फुलांवर फुले चढवून आपली मंगळागौर मोठ्ठी मोठ्ठी केली होती. रात्रीं मंगळागौर जागवण्यासाठीं वशेच्या मुली तर सगळ्या होत्याच. अन् मालकीण-बाईंनीं इतरहि कांहीं शेजारच्या मुलींना अन् प्रौढ स्त्रियांना जागायला बोलावलें होतें.

चौरंगावर मंगळागौरीची स्थापना झाली होती. तिच्या पाठीमागें रेवळींत लामणदिवा तेवत होता. पुढें ताटांत पंचारती होती. समोर निरनिराळ्या प्रकारच्या रांगोळ्या सुबकपणें काढल्या होत्या. हळदी-कुंकवाचें तबक जवळच संभृतसंभार ठेवलें होतें. आणि थोड्या वेळा-पूर्वीं फराळ वगैरे आटपून मुली आतां फुगड्या खेळत होत्या.

एक जोडी दमून अन् घेरी येऊन जमिनीवर बसली कीं दुसरी उठे; दुसरीनंतर तिसरी. त्यानंतर पुन्हा एखाद्या मुलीची आलटापालट करून पहिली खेळायला येई. अशी नुसती झुम्मड चालली होती.

बहुधा अशा वेळीं मुलींची प्रतिभा जागृत झाल्यावांचून रहात नाहीं. फुगडीला जसजसा रंग चढतो तसतसा त्या प्रतिभेचा आविष्कार उखाण्यांच्या रुपानें होऊं लागतो.

खेळतां खेळतां एक मुलगी आपल्या जोडीदारिणीला म्हणाली,

**'मागील दारीं खुर्ची पुढील दारीं खुर्ची**
**××× रावांनीं बायको केली लवंगी मिर्ची**

फुः फुः फुः —,'

पण ही लवंगी मिरची तिच्या नाकाला झोंबायला वेळ लागला नाहीं. दुसरीनें लगेच आलेल्या अहेराची परतफेड केली.

अशा रीतीनें दंड फुगडी, निसर फुगडी, झिम्मा, कोंबडा, जेवढे म्हणून फुगडीचे प्रकार होते तेवढ्या सर्व प्रकारानीं मुली खेळल्या. एकमेकींची मनसोक्त थट्टामस्करी केली. एकमेकींच्या काव्यमय उखाळ्या पाखाळ्या खूप काढल्या. शेवटीं सगळ्या दमल्या. लाल लाल गाल करून कपाळावरचीं घर्मबिंदूंचीं मोत्यें पदरानें टिपीत त्यानीं बैठक मारली अन् मग गाण्यांना सुरवात झाली. एकेका मुलीनें आळीपाळीनें गाणें म्हटलें. त्यांत अनिरुद्ध–उषेचें लग्न, रुक्मिणीचें स्वयंवर, रामाचा वनवास, सतीचें चरित्र, जांभूळ, गिरीशांची 'शूर्पणखा' यशवंताची 'आई,' 'सुधारणा,' 'फॅशन' इत्यादि नव्या जुन्या बऱ्याच काव्य-प्रकारांची उजळणी झाली.

— विमलाबाई, तुम्ही म्हणाहो एखादं गाणं.—एका मुलीनें आपल्या जवळ बसलेल्या एका युवतीला म्हटलें.

एवढा वेळ कोणाचेंच लक्ष तिच्याकडे नव्हतें. पण आतां सगळ्याच मुली तिच्याकडे पाहूं लागल्या.

अंगकाठी वेत्रीसारखी, पण हाडांचा सांपळा नव्हे, वर्णानें सांवळी, कांतीनें नाजूक, लाबसर चेहरा, नाक चाफेकळी नसलें तरी तरतरीत, अशी ती वीस एकवीस वर्षांची तरुणी होती. एवढ्याच वर्णनानें तिचें कल्पनाचित्र ठळकपणें पुढें उभें रहाणार नाहीं. त्यासाठीं आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. तिचें सारें वैशिष्ट्य होतें तें तिच्या डोळ्यांत. अतिशय सुंदर अन् चमकदार होते ते. तिच्याकडे पाहिल्यावर पहाणारी व्यक्ति तिच्या आकर्षक नेत्रयुगुलाच्या मोहिनीनें भारली जाई. कवि-संकेतानें ठरून अन् मळून गेलेली कमलाची उपमा देण्याचें माझ्या मनांत आलें होतें. पण कमळें सुंदर असलीं तरी तेजस्वी कुठें असतात!

गाणें म्हणायला सांगून दोन तीन मिनिटें झालीं तरी ती गप्पच होती. अन् म्हणेल असें कांहीं चिन्हहि तिच्या मुद्रेवर अजून उमटलें नव्हतें. उलट ती अधिकच गंभीर झालेली दिसली.

— खरंच म्हणा कीं हो एखादं गाणं. तुमचा गळा कित्ती छान आहे. —— दुसऱ्या मुलीनें आग्रह करतां करतांच स्तुतीचाहि एक घोट पाजला.

अन् मग चोहोंकडून 'म्हणा कीं हो' 'म्हणा ना हो'चा वर्षाव झाला तिच्यावर.

तिला उल्हास नव्हता. पण बायकांचा आग्रहाह माडवेना. आपण कांहीं म्हटलें नाहीं तर तो मंडळींचाच नव्हे तर मंगळागौरीचाहि

अपमान होईल असें तिला वाटूं लागलें. सगळ्या मुलींनीं विविध पूजोपचारांनीं तिची सेवा केली तशीच आपलीहि काहींतरी अल्पस्वल्प सेवा तिच्या चरणीं रुजू झाली पाहिजे असे तिचें भावपूर्ण मन तिला सांगूं लागलें. क्षणभर तिची दृष्टि अर्धोन्मीलित झाली. तिनें आपला करसंपुट मस्तकापर्यंत वर उचलून गौरीला नमस्कार केला अन् ती गाणें म्हणूं लागली,

**'प्रतीक्षा मी किती आतां करूं कंटळला जीव**
**सख्या ये राघवा! स्नेहामृतातें शीघ्र पाजीव!......'**

विमला गाऊं लागतांच जिकडेतिकडे एकदम स्तब्धता पसरली. तिचा आवाज फार गोड होता. तशीच वाणीहि शुद्ध होती. प्रत्येक काव्यपंक्तींतल्या विरामाच्या जागीं तिच्या स्वराचें जें नाजूक कंपन होई त्यामुळें श्रोत्यांचें हृदय भरारून उठे. तिच्या आवाजाला तो कंप स्वाभाविकच होता कीं कसल्या तरी कातरतेनें तो निर्माण झाला होता हें कळायला मार्ग नव्हता. कवितेतला करुण रस तिच्या कारुण्यपूर्ण स्वराची जोड मिळतांच अधिकच गंभीरतेने वाहूं लागला. अथांग डोहाच्या काठीं उभें राहिल्यावर त्यांतील संथपणें वहाणाऱ्या काळ्यानिळ्या पाण्याकडे पाहिल्यावर मनाला जी एक प्रकारची शिरशिरी येते तसें तिच्या गाण्यामुळें झालें. त्या काव्याशीं ती इतकी तन्मय झाली कीं, ती दुसऱ्या कोणाचें तरी काव्य गात नसून तिच्याच अंतरांत न सामावणाऱ्या या भावनोर्मि शब्दस्वरूप घेऊन बाहेर पडत आहेत, असेंच कोणालाहि वाटलें असतें.

तिच्या गाण्याला यावेळीं वातावरणहि फार अनुकूल होतें. बाहेर गडद अंधार पडला होता अन् पावसाची सरहि जोरांत सुरू होती

रजनी देवी अश्रुविमोचन करीत होती. तिचा वल्लभ कृष्ण मेघांनीं दूर कुठेंतरी पळवून नेला होता. विद्युल्लतेच्या तीक्ष्ण दृष्टीनें तिनें त्याला शोधलें. गडगडाटाच्या उच्च स्वरानें तिनें त्याला टाहो फोडून हाका मारल्या. तरीहि तो तिला भेटला नाहीं. शेवटीं सर्व उपाय थकल्यावर ती आतां अनवरत अश्रुवर्षाव करीत होती.

मग विमलनेंहि आतां चटकन् डोळ्याला पदर लावला तो कां ? रजनीसारखीच तीहि दुःखी कष्टी होती का ? आतां तर तिचा कंठ अगदीं कांठोकांठ भरून आला होता. जणूं तिच्या हृदयाभोंवतालचे सहनशीलतेचे दृढ बंध तटातट तुटत होते. तिच्या मनाची असहाय्यता, दुर्बलता या वेळीं तिच्या स्वरालाहि बाधली होती. किती क्षीण निघत होता तो ! कसें बसें तिनें तें गाणें संपवलें.

थोडा वेळ त्या स्त्रीसमूहांत उदास शांतता पसरली. त्यानंतर कोणी गाणें म्हटलें नाहीं अन् कोणी कोणाला म्हणायचा आग्रहहि केला नाहीं.

गाणें संपलें म्हणून रात्र कांहीं संपली नव्हती. ती मजेंत घालवायला मुलींना कांहींतरी नवे नवे विनोदनप्रकार हवे होतेच.

त्यासाठीं मग नांवें घेण्याची कल्पना निघाली.

'तूं घे ग आधीं.' 'वाः तूं घे कीं अगोदर' असा एकमेकींना आग्रह करीत प्रत्येक मुलीनें लाजत मुरकत नवऱ्याचें नांव घेतलें.

— विमलाबाई, आतां तुमची पाळी बरं का ?— एकीनें हळूच विमलेला डिवचलें.

— तुम्हाला उखाणे चांगले रचतां येतात. एखादा छान छान उखाणा घ्या हो.—दुसरी म्हणाली.

— खरंच का? मग ऐकूंया तरी बाई.—एका पोक्तशा स्त्रीनें उत्सुकता दर्शविली.

बराच वेळ विमल गप्प होती. मुली भारखा तिचा पिच्छा पुरवीत होत्या. शेवटीं जराशी एकटी चिडून म्हणाली देखील,—तुम्ही तरी बऱ्याच ह्या आहांत कीं. इतका वेळ आम्ही सगळ्या आग्रह करतें त्याचं कांहींच वाटत नाहीं तुम्हाला, नाहीं का?

ही नांव घेण्याची कल्पना प्रथम ज्यानें काढली असेल त्याच्या रसिकतेची प्रशंसाच केली पाहिजे. स्त्रियांना मुग्धमधुर अशा सुखसंवेदनांचा अनुभव देणारा तो एक मनोज्ञ प्रकार आहे यांत शंका नाहीं. नाहींतर एवढा वेळ निर्विकार मनानें बसलेल्या विमलेचें मुखमंडल आतां जें क्षणभर टवटवीत दिसलें तें इतर कशानेंहि होतें ना. मनांतल्या मनांत जुळणी करून तिनें उखाणा घ्यायला प्रारंभ केला—

**चकोर राहिला पैलथडी, मधें नदीचें पात्र**
**वियोगाच्या भीतीमुळें थरके चकोरीचें गात्र**

आणि —

पुढें स्तब्ध!

— इश्श! ही कविता बिविता आहे कीं काय एखादी? एकीनें विचारलें.

— कविता नव्हे बरं का पंडिताबाई; उखाणा आहे तो. तूं तरी भारीच उतावळी कीं ग. पुरुष असतीस तर म्हटलं असतं, 'उतावळा नवरा नि गुडघ्याला बाशिंग'—दुसरीनें तिला टोमणा देऊन विमलेला म्हटलें,— हं. उत्तरार्ध पुरा करा कीं!

आणि इथें मात्र सर्वांचा आग्रह निरुपयोगी ठरला. विमलेच्या तोंडून उत्तरार्ध कांहीं पुरा झाला नाहीं. तिनें जें तोंड मिटलें तें अगदीं आळीमिळी गुपचिळी.

चिवट लाकूड फोडणें सुद्धा सोपें असतें. दोन घाव जास्त जोरानें मारले कीं शकलें होतात त्याचीं. पण मिटलेलें कमळ? तें उमलवणें कठीण. कितीहि फुंकर घातले तरी त्याच्या पाकळ्या कांहीं विलग होत नाहींत.

वास्तविक तिला तो उखाणा पुरा करायचा होता.

**'मनोहरपंतांच्या भेटीसाठीं विमला झुरते अहोरात्र'**

हा त्याचा उत्तरार्ध तिच्या कंठांतूनच नव्हे तर रोमरोमांतून बाहेर पडण्यासाठीं गर्दी करीत होता. पण निकराच्या संयमानें तिनें त्याला दाबून टाकलें होतें.

कां?

आपल्या प्रतिकूल परिस्थितीची तिच्या मनाला झालेली जाणीव!

तिला वाईट वाटत होतें. ती मनांत म्हणत होती, 'किती अभागी मी! मला माझ्या माझ्या पतीचं नांव घ्यायचीसुद्धा चोरी झाली आहे. या मुली किती भाग्याच्या! सगळ्यांचे मुखचंद्र कसे उल्हसित दिसतात. त्यांचा सूर्य त्यांना प्रकाश देत त्यांच्या पाठीमागें उभा आहे ना! अन् मी? माझा सूर्य कुठें आहे?'

तिचा नवरा कुठें नाहींसा झाल्याला आज पांच वर्षे लोटलीं होतीं. एक दिवस बापलेकांचें निकराचें भांडण झालें अन् अवघ्या एका वस्त्रानिशीं तो घरांतून निघून गेला. त्यानंतर वीतभर चिठ्ठीसुद्धां कधीं आली नाहीं त्याची.

बापाला पश्चात्ताप झाला. आई घळघळां रडली. सर्वांनाच वाईट वाटलें. पण बिचारी विमला! तिचें दुःख गंभीर होतें, शब्दातीत होतें.

पाण्यावांचून मासोळी तशी पतीवांचून विमला तळमळत होती अन् आज येईल, उद्या येईल असे आशानिराशेचे हेलकावे खात होती.

एखादा दुर्भागी भाग्यवंतांच्या मेळाव्यांत जाऊन बसला कीं त्याला स्वत:चीच लाज वाटूं लागते. विमलेचेंहि तसेच झालें. आपण अन् त्या मुली यांच्यांतला साम्यविरोध ठळकपणें तिच्यापुढें उभा राहिला. मुली सोंगट्या खेळत होत्या तरी तिचें तिकडे लक्ष नव्हतें. ती सारखी मंगळागौरीकडे पहात होती. विरहज्वालानीं होरपून गेलेलें आपलें काळीज उघडें करून ती जणूं मंगळागौरीला विचारीत होती, 'आई, देवते, देशील का तूं माझ्या या दग्ध हृदयाला पुनर्जीवन?'

सकाळीं ऐकलेली मंगळागौरीची कहाणी तिला आठवली. मुलाचा अपमृत्यु डोळ्यांसमोर तरी घडायला नको म्हणून आईबापानीं दगडाचें काळीज करून काशीवासाला पाठवलेला एकुलता एक मुलगा. वाटेंत त्याचें लग्न झालें. नववधूची पहिली मंगळागौर अन् तोच त्याचा अपमृत्यूचा दिवस. रात्रीं गाढ झोपेंत त्याच्या उशाशीं फणा उभारून आलेला तो काळसर्प. गौरीच्या कृपेने त्याचें नवरत्नांच्या हारांत झालेलें रुपांतर. एक वर्षानंतर त्याचें स्वगृहीं पुनरागमन. वेशींतून गावांत तो आला असें पहातांच धावत धावत कांहीं माणसें त्याच्या घरीं जाऊन आईबापानां आनंदाची बातमी सांगतात, 'बाई बाई, तुमचा मुलगा येतो—'

'ब्राह्मणा ब्राह्मणा, तुमचा मुलगा येतो—'

त्यांना तें खरेंच वाटेना.

– आतां कुठून येणार आमचा मुलगा! देवाघरचं लेणं. देव घेऊन गेला तें— तीं दोघें म्हणालीं.

—२—

पण प्रत्यक्ष जेव्हां पुत्राची अन् मातापितरांची भेट झाली, तेव्हांचा त्रिभुवनांत न मावणारा तो त्यांचा आनंद !

विमला विचार करीत होती. 'या कहाणीप्रमाणेंच कोणीतरी आमच्याहि घरीं येऊन सांगेल का ?

— बाई बाई, तुमचा मुलगा येतो.

— विमल, विमल, तुझे...

* * *

सकाळीं विमला घरीं आली. सृष्टीनें देखावा बदलला. पण विमलेच्या मनांतले विचार कांहीं बदलेनात.

— माझा ललाटलेख विधात्यानं काय बरं लिहिला असेल ? माझ्या सौभाग्याचं साफल्य अन् स्त्रीजीवनाचं सार्थक कधींतरी होणार आहे का ? येतील का ते परत घरीं ? दोन जीवांची मिळणी होईल का पुन्हा ? होईल; नक्की होईल !

' वेडे विमले, तुझ्या या मधुर कल्पनेला आधार काय ?' कुशंकी मनानें तिला प्रश्न केला.

— आधार माया–ममतेचा. प्रेमाचा. त्यांचा माझा अल्पसा सहवास. पण किती भावरम्य होता तो ! तेवढ्या अवधींत प्रीतिसुमनांची सतत वृष्टी त्यांनीं माझ्यावर केली नाहीं का ?

गतकालांतला एक चित्रपट तिच्या डोळ्यांपुढे चमकला.

लग्न झाल्यानंतर सहा महिन्यांची गोष्ट. तीं दोघें संध्याकाळच्या वेळीं गोठ्यांत गेलीं होतीं. दोन तीन गाई दुभत्या होत्या त्यावर्षीं त्यांच्या घरीं. गुरांना दांव्यावर बांधून तो गाईची धार काढायला बसला होता.

विमला वासरांची सोडबांध करीत होती. धार काढून झाल्यावर फेसाळणाऱ्या दुधानें भरलेली चरवी विमलेच्या हातांत देऊन तो गाईची पाठ खाजवूं लागला. विमला चरवी हातांत घेऊनच एका लहानग्या गोजिरवाण्या वासराच्या कपाळाला आपला गुडघा लाऊन त्याच्याशीं टक्कर खेळत होती. पण खेळतां खेळतां वासराची ढुशी तिच्या हातांतल्या चरवीला लागली अन् चरवी जमिनीवर पडली. दुधाचे लोट गोठ्यांतल्या चिखलांतून वाहूं लागले. 'पंकीं जेविं पयाच्या धारा' ही चारुदत्तानें चंद्रकिरणांना दिलेली उपमा तिथें प्रत्यक्ष पहायला सांपडली.

— काय केलंस हें विमल? — तो म्हणाला. विमलेला भीति वाटली. तिचे नाजूक ओठ थरथरूं लागले. अन् डोळ्यांच्या कडाही ओल्या झाल्या.

— सासूबाई रागावतील आतां!

— तूं जा आतां घरांत. मी करतों त्याची व्यवस्था.

विमला चोरपावलांनीं घरांत शिरली अन् पाठीमागून थोड्या वेळानें रिकामी चरवी हातात घेऊन तो आला.

— आईग. माझ्या हातून सगळं दूध सांडलं आज. चरवीच गळून पडली. — त्याची मुद्रा यावेळीं अपराध्यासारखी दिसत होती.

— तुझं असंच जिथं तिथं. मी गेलें नाहींना आज गोठ्यांत! त्याचं प्रायश्चित्त मिळालं मला. — त्याच्या आईचा स्वर यावेळीं थोडासा कठोर झाला होता.

विमलेनें स्वैपाकघरांतून हें सारें ऐकलें. पत्नीचा अपराध स्वतःच्या शिरावर घेऊन तिला नामानिराळें ठेवण्याची त्याची ही युक्ति विमलेला

अपूर्व वाटली. असें कांहीतरी तो करील अशी तिला कल्पनासुद्धा नव्हती. आपल्या पतीच्या उदार अंतःकरणाची अशी साक्ष पटतांच तिला गहिंवरून आलें.

नवरा ओटीवर गेला आहे असें पाहून ती सासू माजघरांत बसली होती तिथें आली.—ऐकलं का? आजचं दूध...

पण तिचें वाक्य पुरें होण्याच्या आंतच सासू म्हणाली,

— सांगितलंन् त्यानं मला. तसलाच आहे तो धसमुसळया. एक काम कांही धड व्हायचं नाहीं त्याच्या हातून.

— तें दूध माझ्याच हातून सांडलं.

— खरंच ?

— हो ! — विमलेनें खालच्या मानेनें म्हटलें.

सासूच्या रागाचें लगेच वात्सल्यांत रूपांतर झालें.

— माझ्याशीं असा लपंडाव खेळता होय? कायरे मन्या, बायकोनं दूध सांडलं, असं सांगितलं असतंस तर मी काय तुझ्या बायकोला सुळीं दिलं असतं असं वाटलं तुला ?

तिला आपल्या मुलाचें अन् त्याहून सुनेचें जास्त कौतुक वाटलें.

— जन्मभर अशींच नांदा बरं एकमेकांसाठीं !— म्हातारीला पुढें बोलवेचना.

या व अशाच प्रकारच्या कित्येक रम्य स्मृति उराशीं बाळगून विमला त्यांना अश्रूंच्या पाण्यानें फुलवीत होती.

आणखीहि एक तिचें नाजूक रहस्य होतें. प्रेमशास्त्राच्या दृष्टीनें तिनें एक अमूल्य असा त्याग केला होता. तिला सोन्याच्या बिलवरांची

फार हौस होती. तिच्याकडून या ना त्या रूपानें ती बरेच वेळां व्यक्त झाल्यावर तिच्या सासूनें थोडें सोनें घेऊन अन् घरांतलें इतरहि किडूक मिडूक त्यांत मिसळून तें सोनाराकडे बिल्वर करण्यासाठीं दिलें होतें. विमलेचा नवरा घरातून निघून गेल्यावर थोड्याच दिवसांत ते बिल्वर तिला मिळाले.

पण आतां तिला ते हातांत घालण्याची हौसच उरली नव्हती. तिनें ते बिल्वर तसेच पेटींत घालून ठेवले. ज्या दिवशीं घरीं येणं होईल त्या दिवशीं, त्याच सुमुहूर्तावर हे हातात घालायचे असा तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला होता. विमला सणावारींसुद्धां बिल्वर हातांत घालीत नाहीं याबद्दल सासू एकदा तिच्यावर रागावलीहि. पण विमलेनें आपला निर्धार ढळूं दिला नाहीं.

त्या बिल्वराबद्दलच आतां तिचे विचार चालू होते. ' पुनर्भेटीच्या पहिल्या रात्रीं आपण ते बिल्वर घातले कीं ते खात्रीनें असंच म्हणतील नाहीं का ?– अरे वा: आज नवे बिल्वर दिसतायत् हातांत ! आहेऽऽ ब्बुवा राणीसाहेबांचा थाट ! किती छान शोभतात तुझ्या हाताला, नाहीं ? कधीं केले हे ? –

मग मी सांगेन, – बरेच दिवस झाले. आपण निघून गेल्यानंतर थोड्याच दिवसांत.

– मग अगदीं नवे कोरे कसे दिसतात ? उजळा दिलास वाटतं ?

– छे. आजच पहिल्याप्रथम घातले आहेत ते मी.

– कां ?

– उगीच !

— उगीच कसं ?

मग काय बरं मी उत्तर देऊं ? 'आपण घरीं नव्हतां म्हणून घातले नाहींत' असं का सांगायचं ? छेः ! मला मुळींच नाहीं आवडायचं तसं सांगणं. तें आपण आपल्याच तोंडानं सांगण्यांत काय चव आहे ? तें दुसऱ्यानं तर्कानं अथवा भावनेनं जाणून घ्यावं.

त्यांना बरोबर समजेल तें. दुसऱ्याच्या मनांतलं गुपित ओळखण्यांत स्वारीचा हातखंडा आहे. अन् मग म्हणतील,—समजलों मी. विमल, किती त्यागशील प्रेम हें तुझं माझ्यावर !

मोठ्या अभिमानानं मीं त्याच्या दृष्टीला दृष्टि भिडवीन. पण, नाहींच जमायचं मला तें. स्तुतीच्या भारानं मान ताठ कशी होणार ? अधिकच खालीं वाकेल ती.

— अशा रत्नाला मी इतकीं वर्षं तळमळत ठेवलं. किती मी चांडाळ !....

मी चटकन् त्यांच्या तोंडावर हात ठेवीन.

— अशानं मी बोलायचीच नाहीं जा गडे आपल्याशीं.

— बरं बुवा, राहिलं.

पण त्यांच्या अनुतप्त हृदयाची धडधड अन् डोळ्यांत तरंगणारे अश्रु मला दिसल्यावांचून का रहातील ? मी हळूच त्यांच्या गळ्यांत हात टाकीन नी पदराच्या टोकानं ते पवित्र अश्रु पुशीन. अन् मग......

मीं म्हणेन—इश्श !

कल्पना म्हणजे वारा असें एका लेखकानें म्हटलें आहे तें खोटें नाहीं. त्या वाऱ्यानें विमलेला अलगद उचलून एका निराळ्याच रम्य सृष्टींत नेऊन सोडलें.

सायंकाळचा समय आहे. सांध्यमेघानीं आकाशांत गुलाल उधळला आहे. सागरिकेच्या इवल्या इवल्या लहरी आपल्याला खेळायला बोलवीत आहेत. मऊ मऊ वाळूंतून आपण त्यांच्याकडे चाललों आहों. पाठीमागें कसलें तरी चित्तवेधक तंतुवाद्य दीपरागाचे स्वर आळवीत आहे. अन् आपल्या धगधगत्या हृदयावर कोणीतरी संजीवनीचा रस शिंपडीत आहे असें तिला वाटलें.

या स्वप्नभूमींतून सत्यसृष्टींत उतरायला तिला बराच वेळ लागला. ती भानावर आली तेव्हां आपल्या हातांत केरसुणी असून अर्ध्याच माजघराचा केर निघाला आहे हें तिच्या लक्षांत आलें. ती मग भराभर आपल्या कामाला लागली.

* * *

असेच आणखीही काही दिवस लोटले. अन् त्या नंतर एक दिवशीं...

दुपारचीं जेवणं नुक्तींच झालीं होतीं. विमलेचा सासरा खोलींत वामकुक्षी करीत होता. सासू पडवींत कोणाशींतरी बोलत उभी होती. विमला स्वैपाकघरांत ओणव्यानें उष्टयाला शेण लावीत होती.

इतक्यांत मागच्या दारानें एक व्यक्ति घरांत शिरून तिच्या पाठीमागें येऊन उभी राहिली.

विमला भीतीनें एकदम ओरडली.

त्या भयानक पुरुषाची दाढी वाढलेली होती. डोक्यावरहि केसांचें चरबट झालें होतें. शरीराचा सांपळा झालेला होता. आंग धुळीनें माखलें होतें. डोळे लाल इंगळासारखे पण तारवटलेले दिसत होते. कंबरेला लंगोटी अन् काखेंत एक फाटकीशी झोळी यावांचून त्याच्या अंगावर वस्त्र नव्हतें.

विमलेचें ओरडणें ऐकून सासू धांवतच घरांत आली. सासराहि खडबडून जागा झाला. दोघांनींहि त्याला ओळखलें.

दुर्दैव विमलचें. तो तिचा नवरा होता.

झोळी खुंटीला अडकवून तो हातपाय धुण्यासाठीं पाटावर गेला. आईनें त्याची दृष्टि चुकवून खुंटीवरच्या त्या झोळींत हात घातला. थोडीशी गांजा, काड्यांची पेटी, कळकटशी एक चिंधी, एक लांबलचक चिलीम, नी एक टमरेल एवढ्या वस्तु त्यांतून बाहेर पडल्या. आल्यापासून गाजाच्या तारेंतच होता तो. काय हवं तें बडबडत होता.

शेजारचीं माणसें विमलेचा नवरा आला हे ऐकून त्याला पहाण्या-साठीं तिथें गोळा झालीं. घटकाभर चांगलीच करमणूक झाली त्यांची. फुकटांत मौज पहायला मिळाली त्यांना.

पण विमला! तिला काय वाटलें असेल? आनंद का शोक? सुख कीं दुःख? तिचें तिलाच कळत नव्हतें तें.

सकाळच्या प्रहरीं चोहोंबाजूनीं दाट धुकें पसरावें अन् वाटसरूला पुढचा रस्ता मुळींच दिसूं नये, अन् मागें जाण्यासाठीं वळून पहावें तों तिकडूनहि वाट बंद व्हावी म्हणजे तो जसा दिङ्मूढ होऊन तिथल्या तिथेंच घुटमळत रहातो तशीच विमला या वेळीं घुटमळली होती.

हळू हळू संध्याकाळ झाली. सूर्य अस्ताला गेला. मागोमाग कृष्ण रात्रीनें जग व्यापून टाकलें. अन् त्याच रात्रीं—

पेटीचें कुलूप निघालें. तिच्या खणांतला एक पितळी डबा उघडला. ते डायमंडघाटी बिल्वर दिव्याच्या अंधुक प्रकाशांत लख्खकन् चकाकले. विमलेचीं चार आसवें त्यांच्यावर गळलीं अन् धाडकन् पेटी बंद झाली!

# चपला – हार

## १ : ललिता

रात्रीची बारा वाजायची वेळ आहे. सगळं जग कसं शांतपणें झोपी गेलं आहे. रातकिडेच काय आवाज काढीत असतील तो. बाकी जिकडे तिकडे निस्तब्ध वातावरण. डोळे फोडून बाहेर पाहिलं तरी दाट अंधारावांचून कांहीं दिसत नाहीं. उशागतीं असलेलं घड्याळ मंदपणें टिकटिकतं. मधून मधून गोठ्यांतल्या गुरांच्या रवंथाचा आवाज अन् शिंगांची खडखड ऐकूं येते. क्वचित् दूर कुठल्यातरी शेतांत माळ्या राखणाऱ्या लोकांची अस्पष्टशी हाकाटीहि कानावर येते.

आपल्या विषम परिस्थितीचा विचार करीत बसायला दिवसभर दाबून ठेवलेले अश्रूंचे उमाळे कोणाला न दिसतां न दाखवतां बाहेर टाकायला किती अनुकूल वेळ आहे ही!

एका महिन्याच्या मुदतीनं माहेरीं गेलेली मी; पण जेमतेम वीस दिवस भरतांच परत घरीं निघून आलें. 'आणखी चार दिवस तरी रहा' म्हणून आई किती आग्रह करीत होती. माझ्या बालमैत्रिणीनं—सरोजनं—तर पिच्छाच पुरवला माझा. पण मीं कोणाचंच ऐकलं नाहीं. येतेवेळीं आईनें टोमणा मारला देखील. 'पोरीला आतां मायाच कमी झाली आमची.'

मला एवढी घाई कां लागली हें सरोजनं ओळखलं. चोराचीं पावलं चोरालाच कळायचीं. तिनं त्यावेळीं केलेली माझी थट्टा मला किती मृदुमधुर वाटली. त्या नर्मपरिहासाच्या शब्दांवर तरंगत तरंगतच मी घरीं आलें.

इतक्या तांतडीनं घरीं यायला पतीच्या सहवासाची ओढ हें जितकं महत्त्वाचं कारण तितकंच दुसरंहि एक होतं. माझ्या गैरहजेरींत संसाराची धर्मशाळा करून टाकतील अशी भीति वाटत होती मला.

अन् घरीं येऊन पहातें तर खरोखरच तस्सा प्रकार. मीं घरीं पोंचलें तर दरवाजाला कुलुप. स्वारी गेली होती कुठेंतरी भटकायला. बायका घरीं नसल्या कीं पुरुषांना दाही दिशा मोकळया होतात म्हणतात त्या अशा. मला असा राग आला...

'कांटा माझ्यापायीं रुतला। शूल तुझ्या उरीं कोमल कां?' हा चरण गुणगुणत स्वारीनं जेव्हां अंगणात पाऊल टाकलं, तेव्हां माझा राग शक्य तितका तीव्र करण्याचा मी मनांशीं निर्धार केला. पण डोळ्यांनीं मला फसवलं अन् ओठच्या पाकळ्याहि चटकन् कशा विलग झाल्या कोणास ठाऊक.

— कोण ललिता? अरे वा:! अगदीं अचानक...इन्स्पेक्टर साहेबानं एखाद्या शाळेला अनपेक्षित भेट द्यावी तशी आलीस कीं तूं! मला तर अगदीं धक्काच बसला.—ते खट्याळपणें म्हणाले.

— आपणाला धक्का बसला तसा या कुलुपाला बसला असता तर? एव्हांना मी घरांतली सगळी आवरासावर तरी करून बसलें असतें.—मी म्हटलें.

— खरंच कीं. दाराला कुलुप होतं नाहीं का? काय बुवा हल्लींचीं कुलुपं तरी खाष्ट! घरच्या मालकिणीला सुद्धां ओळखीत नाहींत म्हणजे काय गोष्ट आहे?

— आपल्याला तरी राहिली आहे ना ओळख?

— चेहरा ओळखीचा वाटतो खरा.—असं म्हणून एक हास्याची फैर झाडीत त्यांनीं दार उघडलं.

त्या दिवशींची ती रात्र भान हरपून घालवली आम्हीं. वसंतांतला फुलोरा अन् शरद् ऋतूंतलं पुनवेचं चांदणं हीं दोन्ही त्या रात्रीं एकाच वेळीं फुललीं होतीं. आमच्या मनांत जणूं काय लक्ष्मण नि ऊर्मिला हें विरही दांपत्य चौदा वर्षांच्या वनवासानंतर पुन: एकत्र आलं होतं.

मला वाटतं, तीच आमच्या निरुपम सुखाची शेवटची रात्र! आतां यापुढें तो एकजीवपणा, ती मादकता, तें आत्मार्पण या गोष्टी लाभल्या तर स्वप्नांतच!

कारण दुसऱ्याच दिवशीं माझ्या संसाराचं नाटक एका निराळ्याच तऱ्हेनं रंगत असल्याचं मला समजून आलं. खलपात्रां शिवाय

नाटकाला मजा येत नाहीं म्हणतात. आमच्या नाटकांतहि एक खल-पात्र आहे अन् त्याचा नुकताच प्रवेश सुरू झाला आहे हें मला त्याच दिवशीं प्रथम समजलं.

शेजारच्या घरीं हळदी–कुंकवाचं बोलावणं होतं मला. दुपारीं चार वाजतां मी वेणीफणी केली, लुगडं बदललं अन् कपाट उघडून दागिन्यांचा डबा काढला.

डब्यांत सगळे दागिने होते. नव्हता तो एकच. तीनपदरी चपलाहार.

कांपऱ्या हातानं मी तो डबा जमिनीवर ओतला. सगळं किडुकमिडूक विसकटून पाहिलं. लपलेलं एकवेळ सांपडेल; पण नसलेलं कुठून सांपडणार ? माझी छाती धडधडूं लागली.

धांवतच मी माडीवर गेलें अन् विचारलें,

— माझा चपलाहार काय झाला ? डब्यांत दिसत नाहीं !

स्वारी किती दचकली त्या प्रश्नानं ! एकवार आंवढा गिळल्या-सारखं करून ते म्हणाले,

— हार सांपडत नाहीं ? डब्यांत नसला तर ट्रंकेंत असेल. नाहींतर दुभत्याच्या कपाटांत पहा. जाईल कुठं ?

— आपण काढला होता कां कधीं ?

— छे बुवा, मी कशाला काढीन ?

— मग तो दुसरीकडे असणंच शक्य नाहीं. मी माहेरीं जातांना तो डब्यांतच ठेवून गेलें होतें.

—असूं दे. मी देईन हुडकून.

— मला आत्तां पाहिजे. हळदी–कुंकवाला जायचं आहे मला.

— मग जा कीं अशीच एक दिवस. हार न घालतां गेलीस तरी अरविंदाची सौभाग्यवती खास म्हणतील तुला.

— तें कांहीं नाहीं. मला हार आत्तां हवा आहे.

— काय कटकट लावली आहेस माझ्या मागं ! मला वेळ नाहीं आतां.

हे शब्द बोलतांना त्यांनीं कपाळाला कितीतरी आंठ्या घातल्या. खात्रीनं इथं कांहींतरी पाणी मुरतं आहे असा मला संशय आला. चपलाहार म्हणजे काहीं कोपऱ्यांतला केर नव्हे. तो जर खरोखरीच हरवला असता तर यांनीं आकाशपाताळ एक करून सोडलं असतं. घरांतला कोनाकोपरा अन् चिंधीन् चिंधी धुंडाळली असती.

माझ्या मनांत अनेक तर्ककुतर्कांची मालिका सुरू झाली. यांनीं तो विकला असेल ना ? का गहाण टाकला ? का हरवला यांच्या हातून ?

त्यांची त्रासिक मुद्रा पाहून मी खालीं आलें खरी; पण मन बेचैन झालं. हळदी–कुंकवाला जायचं तसंच राहून गेलं. किती आवडत होता तो मला हार ! त्या एकामुळं इतर सगळ्या अलंकारानां मूल्य होतं. मीं तो डबा पुन्हां उघडला. आई नसलेल्या कच्च्यांबच्च्यांसारखे दीनवाणे दिसत होते ते दागिने.

तिन्ही सांजा झाल्या. गाय दारांत येऊन हुंकारली. मी वासरूं सोडलं. पण आंबोणाचं पातेलं तिच्या पुढ्यांत न ठेवतांच मी धार काढायला बसलें. दोन धारा पिळल्या नाहींत तोंच गाईनें लाथ झाडली.

हातांतला गडवा दूर गडगडत जाऊन पडला. लाथ माझ्या तोंडावरच बसायची; पण जिवावरचं बोटांवर निभावलं. मांजर दुधासाठीं म्यॉंव म्यॉंव करीत पायांत घोटाळूं लागलं. पण त्या मुक्या प्राण्याला दुधाऐवजीं चपराकच मिळाली माझ्या हातून. चुलीवरचा भात केव्हां करपला तें कळलंहि नाहीं मला. अन् कंदिलाची ज्योत मोठी झाली तिच्याकडे तर मी नुसती पहातच राहिलें.

त्या हारासाठीं डोक्यांत किडे पडण्याची वेळ आली माझ्या. त्याच्यासाठीं मी त्यांच्या पाठीस लागलें.

अखेर त्यांच्या तोंडून हाराचा पत्ता सांपडला !

पुरुषांच्या अंतरंगाचं चित्र कोणाला काढतां यायचं नाहीं. त्यांतून बायकांना तर मुळींच येणार नाहीं. आम्हीं बायका भोळ्या ! 'स्त्रियश्चरित्रं...' म्हणून एक सुभाषित का दुर्भाषित आहेना, तें एखाद्या स्त्री–जातीच्या निंदकानं लिहिलं असलं पाहिजे. वरून गोड शब्दांची साखर पेरायची अन् आंतून गळा कापायचा हें क्रूर कसब पुरुषांनाच साधेल.

तो हार...!

गांवांतल्या एका नखरेल तरुण कलावंतिणीला–चंचलेला–तिचा नाजूक कंठ सुशोभित करण्यासाठीं या उदारधींनीं देऊन टाकला होता.

एखाद्या बदमाश चोरानं तो लांबवला म्हणून जरी यांनीं मला सांगितलं असतं तरी मीं इतकं वाईट वाटून घेतलं नसतं.

एखाद्या रस्त्यावरच्या भिकाऱ्याला त्यांनीं तो दिला असता तरी मी त्यांना दोष दिला नसता. पण...

मी जेवायला बसलें होते. 'चंचलेला हार दिला आहे' हे त्यांच्या तोंडचे शद्ब ऐकतांच माझ्या हातांतला घास पानांत गळून पडला नि तोंडांतला कांहीं केल्या गळ्याखालीं उतरेना. कांटे टोचतात तसा टोचायला लागला तो घशाला. तस्सं पान टाकून उठलें मी.

रात्रभर आंथरुणावर सारखी तळमळत होतें. हृदयांत जसा कांहीं आगीचा डोंबाळा उठला होता. अश्रूंचा पाऊस पडला तरीहि तो शमेना.

ते माझ्या उशाशीं बसले हाते. मीं झिटकारलं तरी त्यांनीं माझीं आसवं पुसलीं. पण त्यांच्या त्या हस्तस्पर्शांत पूर्वीची प्रेमार्दता, तो हळुवारपणा मला प्रतीत झाला नाहीं. कोरड्या फत्तरासारखा तो हात वाटला मला.

ते मला समजावीत होते. माझ्या विनवण्या करीत होते.

--ललिता, कां उगीच रडतेस? तुझा हार दोन दिवसांत आणून देईल चंचला. तिनं नाहीं आणला तर मी जाऊन घेऊन येईन.

त्यांना वाटलं, मी हारासाठींच रडतें आहे. मी हारासाठीं रडत होतें का?

त्या हारापेक्षां कितीतरी पटींनीं बहुमोल अशी एक वस्तु चंचलेनं लुबाडून नेली होती अन् ती मला जन्मांत कधीं परत मिळणार नव्हती, म्हणून माझा हा विलाप होता.

माझं जीवन मी त्यांच्या जीवनात एकरूप करून टाकलं होतं. माझ्या शरिरांतला अणुरेणु त्यांच्या भोंवतीं पिंगा घालीत होता. त्यांच्या गुणाइतकंच दोषांचंहि मीं मोकळ्या मनानं कौतुक करीत आलें होतें.

पण हा दोष...देहाप्रमाणंच मनालाहि मलिन करणारा हा

महादोष... !

दोष कसला ? दुर्दैवानं माझ्या कोमल हृदयाचं विंधान करून मारलेला विषारी बाण होता तो !

काय करूं ? कसं सहन करूं मी हें ! !

० ० ०

## २ : अरविंद

क्षुद्रबुद्धि हा स्त्रीजातीला देवाघरचा शापच आहे कीं काय न कळे. नाहींतर ललिता आज आठ दिवस जी धुसफुलत बसली आहे तें कसं शक्य झालं असतं ? चंचलेला मी तिचा हार काहीं दिवसांकरितां दिला हाच काय तो माझा भयंकर अपराध.

तिनं बिचारीनं तो आणून पोचवला देखील. पण तरीहि ललितेचा माझ्यावरचा राग जात नाहीं.

मी जेव्हां हार तिच्यापुढें ठेवला तेव्हांचा तिचा अवतार महिषासुरमर्दिनीलासुद्धां लाजवील असा होता.

किती जोरानं तिनं तो माझ्या अंगावर फेकला !

— नको मला. एका बाजारबसवीच्या छातीवर लोळून आलेला तो ओंगळवाणा हार माझ्या डोळ्यांपुढं सुद्धां नको. त्याचं पावित्र्य अन् मांगल्य जळून खाक झालं आहे.—ती धुमसत म्हणाली.

— तुला शोभतं ना हें बोलणं ललिता ?

— नाहींच. मला बोलणं शोभत नाहीं तसा तो हारहि शोभत नाहीं. चंचलेच्याच गळ्यांत कायमचा शोभूं दे त्याला. किती प्रसन्न होईल ती आपल्यावर ! अगदीं गळ्यांत गळा...

— चूप ललिता !— एवढाच क्रोधोद्गार माझ्या तोंडून बाहेर पडला. माझं डोकं भणभणलं त्या शब्दांनीं. भोंवतालची सजीव निर्जीव सृष्टि गरगर फिरत असल्याचा भास झाला मला.

तिरीमिरीनं घरांतून बाहेर पडलों मी. या वेळीं एकांताची जरूर होती मला. गांवाबाहेर एक टेकडी होती तिच्या माथ्यावर चढून मी एका झाडाखालीं बसलों. गार वाऱ्याच्या एक-दोन झुळका माझ्या अंगावर हात फिरवून गेल्या; तरीहि मन शांत होईना.

किती भयंकर आरोप केला होता ललितेनें माझ्यावर ! हल्लींचा तिचा जळफळाट हारासाठींच नव्हता तर !

हुं: — वेडी.

पण ललितेला वेडी कोण म्हणेल ? दुराग्रही अन् आक्रस्ताळी आहे ती. वेड्या माणसाला असले आंतड्याला झोंबणारे उपरोधिक शब्द कसे बोलतां येतील ?

चंचलेला हार देण्यांत माझा दुसरा कोणताहि हेतु नव्हता. तिला खूष करून तिच्याकडून मला कोणतंहि बरं—वाईट उद्दिष्ट साधायचं नव्हतं. तो साधासुधा माणुसकीचा व्यवहार होता. शेजारधर्म होता.

ती एक दिवस माझ्याकडे आली अन् मला म्हणाली.

— मला तुमचा चपलाहार देतां का चार दिवस ?

कुठल्याशा गांवीं एका श्रीमंताच्या घरीं लग्न होतं. त्यानिमित्त तो कलावंतिणीची मोठी मजलस करणार होता. अन् तिच्यामध्यें नृत्य करण्यासाठीं चंचलेला बोलावणं होतं.

बोलून चालून कलावंतिणीची जात. फक्कड वेषभूषेवांचून तिचं

कसं भागायचं ? पण तिजोरीचं कुलूप उघडून स्वतःच्या मालकीचे हवे ते दागिने अंगावर घालायला चंचला कांहीं श्रीमंत नव्हती. अन् अजून ती मिळवितीहि झाली नव्हती.

या सगळ्या गोष्टींचा विचार करून मी बायकोचा हार तिच्या हातीं दिला.

त्या पिवळ्याजर्द हाराच्या दीप्तीनं चंचलेचे काळेभोर हरिणीसारखे डोळे किती हर्षोत्फुल्ल झाले त्यावेळीं.

— एका नृत्यांगनेला तुम्हीं हा हार काढून देतां हें लक्षांत आहे ना ?— ती खोडकरपणानं म्हणाली.

— हो हो. पुरं माहीत आहे. या नृत्यांगनेच्या अंगच्या ललित गुणांचं त्या श्रीमंताच्या दरबारीं योग्य तें चीज व्हावं म्हणूनच मी देतों आहे तो.

— चला !—माझ्या शब्दांत लपलेला ध्वन्यर्थ ओळखून ती म्हणाली.

रुष्टतेचा एक तीक्ष्णमधुर कटाक्ष तिनं माझ्यावर फेंकला अन् लगेच 'जातें हं' असा लाडिकपणानं माझा निरोप घेऊन ती निघून गेली.

चंचला कांहीं वाटेची वाटसरू नव्हती. तिचा अन् तिच्या आईचा आमच्याकडे घरोबा असल्याचं लहानपणापासून मला आठवतं. तिचं घर जरी आमच्या घरापासून मैलभर लांब असलं तरी चार आ' दिवशीं इकडच्या बाजूनं जातां येतां चंचलेची आई आमच्या घरीं आल्यावांचून जात नसे. पुष्कळवेळां चंचलाहि तिच्याबरोबर असायची. अन् ती अवखळ पोर घरीं आली कीं आमच्या परसातल्या अबोलीच्या

फुलांवर संक्रांत आली असें मी समजत असे.

गांवची जत्रा झाली कीं चंचलेच्या आईकडून खाऊचा पुडा आमच्याकडे हमखास यायचा न. तिच्या घरीं आलेल्या कोणत्याहि अमूक वस्तूचा वाटा आम्हाला मिळाल्यावांचून कधींहि राहिला नाहीं. ललिता काल आमच्या घरात आलेली; तिला या गोष्टी ठाऊक नसल्या तरी त्या सत्य होत्या. आमच्या घरात कोणाला कांहीं पडसं — खोकला झाल्याचं समजलं कीं चंचलेची आई सगळी कामं टाकून समाचाराला धावून येई. लहानपणीं मला एकदां विषमज्वर झाला होता तेव्हा तर ती स्वतः उठून डॉक्टरला आणण्यासाठीं पणजीला गेली होती.

सौजन्य अन स्नेहभाव दुसऱ्याकडून घेतला तर आपल्यालाहि तो सव्याज नसला तर मुद्दल तरी परत करावा लागतो; नाहीं का ?

अन् त्यामुळंच मी जर कधीं देवळाकडच्या बाजूला गेलो तर चंचलेच्या घरीं पाच दहा मिनिटं बसल्यावाचून मला परततां येत नसे.

एखाद्या खेपेला ' जाऊंद्या ' म्हणून टाळाटाळी केली अन् तें चंचलेला समजलं तर लगेच दुसऱ्या दिवशीं ती आमच्याकडे येऊन मला म्हणायची,

— काल एका माणसाला देवळाच्या पाठीमागचं आमचं घर दिसलं नाहीं; खरं ना ?

— मला वेळच झाला नाहीं काल.—मी कांहींतरी सबब पुढे करी.

— उभ्या उभ्या येऊन गेलां असतात तर मी कांहीं तुम्हांला बांधून ठेवलं नसतं तिथें. जा...तुमच्यावर रागावलें आहे मी.

अशा वेळीं चंचलेच्या तांबूस कानपुड्या फुगीर होत त्या किती

मोहक दिसत ! अन् तिच्या विलोल दृष्टींत रुष्टतेची जी चमक उठे तीहि तितकीच लोभनीय असे. तिच्याशीं दोन गोड शब्द बोलून तिची कळी खुलवली कीं, आपल्या जुईच्या वेलीसारख्या कृश तनु-लतेचे अनेक मनोज्ञ विक्षेप करून ती आपला आंतरिक हर्ष व्यक्तवी. लहानपणापासून नृत्यकलेचं शिक्षण मिळाल्यामुळें तिच्या प्रत्येक पद-विन्यासांत किंबहुना प्रत्येक अवयवाच्या हालचालींत एकप्रकारची गोड लयबद्धता आली होती.

मी तिच्याकडे जाऊन दिवाणखान्यांतल्या बैठ्या चौफाळ्यावर बसलों कीं, ती खालीं जमिनीवर पण इतकी माझ्याजवळ बसे कीं, तिच्या अंगाचा नसला तरी निदान पदराचा तरी स्पर्श व्हावा.

त्यावेळीं तिनं आंबाड्यावर माळलेल्या वेणीचा नि केसांचा असा एक मिश्र परिमल माझ्या घ्राणेंद्रियांत शिरून माझी चित्तवृत्ति धुंद करून सोडी. अन् चंचलेच्या त्या अनावृत्त भुजदंडावर जेव्हां क्षणभर रोमांच उगवलेले दिसत त्यामुळें आणि कपोल अन् कर्णाग्रें आरक्त झाल्यामुळें माझ्याप्रमाणेंच तिलाहि कसली तरी मधुर अनुभूति घडत असल्याचा मला प्रत्यय येई.

अन् मग मात्र मला फार संकोच वाटे. इतकंच नव्हे तर जीव खालींवर होई अन् गात्रांना किंचित कंपहि सुटे.

—चंचला, जातों मी आतां — असं म्हणून उठलों कीं, कसल्या-तरी सुखस्वप्नांच्या यक्षनगरींतून खालीं उतरल्याप्रमाणें ती माझ्याकडे पाही.

दोन तीन वेळां लागोपाठ असं झालं तेव्हां मला वाटलं कीं, इथें

कांहींतरी निराळी भावना अंकुरित झालेली आहे. चंचला माझ्यावर अनुरक्त झाली असेल का ?

मी या गोष्टीचा अधिक विचार करूं लागलों. चंचला तरुण होती नि कलावंतीण होती. पण समाजांतल्या उच्छृंखल लोलुप पुरुषांना अजून तिच्या घराचा दरवाजा बंद होता. तिनं एखादा धनिक शेठहि पटकावल्याचं ऐकिवांत नव्हतं. उपजीविकेपासून सर्वस्वीं अलिप्त राहून चंचला माझ्या प्रेमाची अपेक्षा करीत असेल का ?

— होय. खरं आहे.— माझ्या मनानं चटकन् कौल दिला. त्यासरशीं तरारून कांटा उभा राहिला माझ्या अंगावर ! कारण माझ्या आयुष्यांत हा प्रसंग नवीन होता.

चंचलेशीं लग्न करून तिला माझ्या गृहिणीपदावर अधिष्ठित करण्याची माझी तयारी नव्हती. आणि एकीशीं लग्न करायचं अन् बाहेर दुसरीशीं असले चोरटे प्रेमसंबंध थाटायचे, यालाहि माझं मन अनुकूल नव्हतं.

थोडा वेळ मी भांबावून गेलें. मी वाहावत चाललों नाहीं ना ? वाहावणार नाहीं ना ? माझं कौटुंबिक जीवन मी स्वतःच्या हातानं डागळून टाकणार नाहीं ना ? असले अनेक प्रश्न मला भेडसावूं लागले.

मी मनाशीं निर्धार केला, आजपासून चंचलेशीं अधिक स्नेह-संबंध ठेवायचा नाहीं. तिच्या घरीं जाणं—येणं आतां बंद !

किती कसोशीनं तो निर्धार पाळला मी ! चंचला माझ्या तरुण दृष्टीला आवडत होती. तिचं निरुपम सौंदर्य, तिच्या अंगप्रत्यंगांत वागडणारं लास्य, गोड भाषण, अन् या सर्वांपेक्षांहि तिच्या हृदयाचा स्नेहाळपणा मला फार प्रिय वाटे. पण तिच्याविषयीं अभेद्य, अभेद्य

अशी अभिलाषी भावना अजून माझ्यांत निर्माण झाली नव्हती, त्यामुळें तिच्या घराकडे वळणारीं माझीं पावलं मी संयमानं मागें वळवूं शकत असें. देवळाकडे गेल्यावर तिला भिरभिर शोधणारी दृष्टि मी एका सूचनेसरशीं रस्त्यावर आणीत असें.

मी हल्लीं तिच्याकडे येत नाहीं म्हणून चंचला माझ्यावर रुसे, रागावे. पण इकडच्या तिकडच्या चार थापा मारून मी वेळ मारून नेत असें.

चंचलेच्या प्रेमाला त्यानंतर माझ्याकडून उत्तेजन मिळालं नाहीं ही गोष्ट खरी; पण तिला तोडून टाकणं मात्र मला शक्य झालं नाहीं माझ्या एकाच कठोर शब्दानं तिचं कुसुमकोमल हृदय चुरडलं जाईल, ही भीति वाटे मला.

माझ्या मनांतला आशय न कळूं देतां मी फक्त तिला दूर ठेवीत आलों होतों.

अन् वस्तुस्थिति अशी असतांना ललितेनं मला कलंकित ठरवावं, या गोष्टीची अतिशय चीड येई मला. तिनं मला सरळ विचारलं असतं तर मी तिला सगळा खरा प्रकार सांगितला नसता कां? माझ्याबद्दल एवढा अविश्वास तिनं कां धरावा? ललिता किती तुसडेपणानं वागते हल्लीं माझ्याशीं. तिच्या दृष्टींत इतका विषार भरला आहे कीं, तो सहन होत नाहीं मला. मी लुब्रेपणानं तिला कांहीं तरी सांगायला जावं अन् तिनं तोंड फिरवावं, हीच का प्रेमाची रीत? निरपराध असतांना कां म्हणून मी अशी कठोर शिक्षा भोगूं?

मला यावेळीं कुठंतरी वाचलेली एक गोष्ट आठवते. 'क्ष' इस-

माचा खून केल्याच्या आरोपावरून न्यायमूर्तींनीं एका गृहस्थाला जन्मठेपेची शिक्षा दिली. वास्तविक त्या क्षचा खूनच झाला नव्हता. तो जिवंत होता. सुदैवानं तो गृहस्थ आपली जन्मठेप भोगून जिवंत परत आला. आणि एक दिवस असा एक मोका साधून न्यायमूर्तींच्या घरासमोर त्यांच्या डोळ्यांदेखत पिस्तूल झाडून त्यानं त्या क्षचा खराखुरा खून केला. आणि तो न्यायमूर्तींना म्हणाला,

– या गुन्ह्याची शिक्षा मी आधीच भोगली आहे !

ललितेनं समजूत घेतली अन् आपल्या मनांतलं संशयपिशाच्च गाडून टाकलं तर ठीक.

पण असं न झालं तर.........

अन् मग ललितेला मी बजावीन—

– ललिता, या गुन्ह्याची शिक्षा तूं आधींच दिली आहेस मला !

× × ×

## ३ : चंचला

त्या दिवशींचा तो प्रसंग आठवला कीं, अजून घाम सुटतो माझ्या अंगाला.

कोण तो अरविंदचा बेफामपणा ! मला वाटतं, पुरुषाच्या प्रेमोन्मादाचा इतका दुर्धर अनुभव क्वचितच एखाद्या स्त्रीला आला असेल.

वेळ पण कशी साधली त्यानं. रात्रीचे आठ वाजले असतील. देवाची पालखी चालू असल्यामुळे आई अन् शेजारच्या घरांतील बहुतेक माणसं देवळाकडे गेलीं होतीं. मी एकटीच फक्त माडीवर होतें.

अरविंद वर केव्हां आला अन् मी त्याच्या बाहुपाशांत सांपडलें

केव्हां, तें मला पुरतेपणीं कळलं सुद्धां नाहीं.

—अरविंद, सोडा...सोडा मला. नाहींतर ओरडेन मी !

—नाहीं, तुला सोडणार नाहीं मी. सोडण्यासाठीं धरलं नाही तुला. तूं माझी आहेस. अन् या माझ्या हृदयांत भरून ठेवणार आहे मी तुला.—तो म्हणाला.

त्याचं तोंड घर्मबिंदूंनीं डवरलं होतं अन् मानेवरच्या शिरा उठून दिसत होत्या. हृदयाचं स्पंदनही जोरांत चाललं होतं. त्याच्या ओठावर ठेवलेल्या माझ्या हाताला त्याचा निःश्वाससुद्धां विलक्षण उष्ण लागे.

एखाद्या वाघानं आपलं भक्ष्य पंजांत घट्ट पकडून ठेवावं तसं तो करीत होता. कुठंतरी अवमानित झालेलं त्याचं पौरुष अतिरिक्त होऊन त्यावेळीं माझा ग्रास करूं पहात होतं. मला त्यावेळीं वाटलं कीं, धृतराष्ट्राच्या वज्रमिठींत भीमसेनाचा लोखंडी पुतळा जसा पीठ होऊन पडला तशीच माझीही गत होणार !

याच्या आधीं अवघे दोन दिवस...आईनं ती गोष्ट मला सांगायच्यापूर्वीं हा प्रसंग घडून आला असता तर...

स्वर्गातल्या अमृतवल्लीचीं फळं मी इथूनच तोडलीं असतीं. त्याच्या दृढालिंगनांत चोळामोळा होतांना माझा जीव मधुरशा तंद्रेत बुडून गेला असता. आकांक्षापूर्तीच्या आनंदरसाचीं अगणित कारंजीं माझ्या प्रत्येक रोमरंध्रांतुन उडूं लागलीं असतीं अन् अरविंद त्यांत न्हाऊन निथळा असता. पण...

जें हवंसं वाटतं तेंच नकोसं झाल्यावर मिळालं कीं त्याला विषाहूनही कडूपणा येतो.

अरविंदसाठीं जिवाचं रान करणारी मी, पण त्यावेळचा तो अरविंद नकोसा झाला मला. त्याचा तो दृढ स्पर्श तप्त लोखंडाच्या पुतळ्याच्या स्पर्शासारखा मला दाहक नि दुःसह झाला. एक प्रकारच्या शिसारीनं माझं मन मळमळूं लागलं.

हजार हत्तींचं बळ अंगांत आणून मीं त्याच्या मगरमिठींतून कशी-बशी माझी सुटका करून घेतली.

धावतच मी जरा दूर गेलें नि कोपऱ्यांतल्या कपाटाचा आश्रय घेऊन माझं थरथरणारं शरीर कसंतरी सांवरून धरलं.

अरविंद जागच्या जागीं उभा राहून माझ्याकडे विस्फारित दृष्टीनं पहात होता.

थंडावत चाललेल्या माझ्या साऱ्या चेतना वाणींत एकत्र करून मी त्याला एकच वाक्य...पण तें निक्षून सांगितलं.

— अरविंद ! ही गोष्ट शक्य नाहीं...!

— किती उलट्या काळजाच्या बायका तुम्ही ! मला वाटतं, काळजाचा तुकडा ज्याला म्हणतात तो तुम्हाला देवानं दिलेलाच नसावा. ललितेनं माझा तसा तिरस्कार केला अन् तूं आतां असं दूर ढकललंस !—अरविंदानं हताशपणें आपलं मस्तक खिडकीच्या गजांना टेकलं. त्याचे डोळे यावेळीं पाणावले होते.

माझेहि अश्रू अनावर झाले. अरविंदाचा तो दीन—दुःखी चेहरा पाहून मला किती दया आली त्याची ! वाटलं कीं त्याला आश्चर्यचकित करणारी एक गोडशी हाक मारावी त्याला. कितीदां तरी त्या कल्पनेनं माझे ओठ हालले. पण शब्द मात्र बाहेर फुटेना.

पंधरा मिनिटं नितांत स्तब्धता पसरली होती त्या जागेत. अन् अखेर...

– चंचला, आतां जातों मी. पण लक्षांत ठेव, आज ना उद्यां तूं माझी झालीच पाहिजेस !

असं बोलून दणदण जिना उतरत अरविंद निघून गेला.

अन् घायाळ होऊन मी पलंगावर अंग टाकलं. ती रात्र मुक्त अश्रुसिंचनांत आणि दुसरा सबंध दिवस विचार करण्यांत गेला माझा.

शेवटीं मी ठरविलं कीं, आतां या गांवांत मला सुरक्षितता नाहीं. निराशेचा दारुण तडाखा बसलेला माणूस वेडा होतो किंवा क्रूर तरी होतो. अरविंद आतां पुरता पिसाळेल. कदाचित् माणसांतूनहि उठेल. आपल्या संसाराचा विचका करील. माझे दुबळे हात त्याला आवरायला आतां समर्थ होणार नाहींत. मी यावेळीं दूर कुठेंतरी निघून गेलं पाहिजे. नाहींतर...

मुंबईला मावशीकडे कांहीं दिवस जाण्याचा मीं आईजवळ हट्ट घेतला. ती या गोष्टीला विशेषशी खूप नव्हती, पण लाडक्या लेकीच्या हट्टापुढें तिचा निरुपाय झाला.

दोन दिवसांत सगळी तयारी करून आज आम्ही बोटींतून मुंबईचा मार्ग आक्रमीत आहों.

अरविंदापासून मी शरीरानें दूर झालें खरी; पण मन सारखं त्याच्याकडे झेपावत आहे. त्याचं पुढें काय होईल, तो आपल्या संसारांत यापुढं रमेल कीं नाहीं, ही चिंता सारखी माझं हृदय पोखरीत आहे.

थोड्या कालापूर्वीं माझी दृष्टिभेटसुद्धां आग्रहपूर्वक टाळणारा अरविंद

त्याच दिवशीं माझ्या प्राप्तीसाठीं इतका बेभान कां झाला याचं अंतस्थ कारण शोधण्याचा जेव्हां मी प्रयत्न केला तेव्हां मला ललितेच्या वेडेपणाची कींव आली. क्षणभर राग देखील आला.

तिनंच त्याला बिथरवलं. आतां तिनंच त्याचा तोल सावरण्याचं बिकट काम पार पाडलं पाहिजे.

त्या हाराच्या बाबतींत ललिता एवढा 'पराचा कावळा' करील अशी मला कल्पना आली असती तर...

पण आतां काय त्याचं? झाल्या गोष्टी परत थोड्याच येतात! आतां मी करण्यासारखा उपाय एकच राहिला आहे.

मुंबईहून ललितेला एक पत्र पाठवायचं कीं—

—ललिता, निष्कारण अरविंदाचा कां छळवाद मांडला आहेस? अरविंदावर तूं संशयानं केलेला आरोप खोटा—अगदीं सर्वथैव खोटा आहे. अरविंद सर्वस्वी तुझा आहे.

अरविंद माझाहि आहे, पण तो माझा अरुदादा आहे. आम्ही दोघं एकाच बापाचीं मुलं आहोंत. ललितावहिनी, चंचला कलावंतीण असली तरी तिलाहि कांहीं नीति-धर्माचीं बंधनं आहेत. रक्ताचा संबंध न ओळखण्याइतकी ती पशु नाहीं!!...

# भावनांचा उन्माद

घरांतलीं अन् शेजारचीं सगळीं माणसें झोपी गेल्याची खात्री झाल्यावर रामभाऊंच्या पडवीवर निजलेले मास्तर हळूच उठून बसले. एकवार सगळीकडे कानोसा घेऊन कोणी जागें नाहीं याची आणखी एकदां त्यांनीं खात्री करून घेतली.

ते उठून उभे राहिले. आपलें आंथरूण गुंडाळून ठेवावें या उद्देशानें ते खालीं वांकले. पण अर्धी वळकटी गुंडाळून होतांच त्यांना काय वाटलें कोणाला ठाऊक! त्यानीं पुन: आंथरूण होतें तसें पसरून ठेवलें. त्याच्या उशागती आठ दहा विड्या अन् काड्यांची पेटी होती. घटकेघटकेला धूम्रपान करण्याची संवय होती त्यांना. पण यावेळीं त्यांनीं विडी ओढली नाहीं.

पडवीच्या दुसऱ्या बाजूला कोणीतरी दुसरी व्यक्ति निजलेली आहे हें तशा त्या गडद अंधारांत कोणालाच दिसणें शक्य नव्हतें. पण त्या बाजूनें मधून मधून सुटणाऱ्या दीर्घ सुस्काऱ्यांवरून तिथें कोणीतरी निजलें आहे अन् त्याला अजून झोंप लागली नाहीं हें सहज कळून येण्यासारखें होतें.

मास्तर त्या दुसऱ्या बाजूलाच गेले. अंधारांत चांचपडत त्या व्यक्तीच्या उशाशीं जाऊन किंचित् ओणवे होऊन ते दबत्या सुरांत म्हणाले,

— मी तिकडे जाऊन येतों बरं का.

पण या सगळ्या कृति करीत असतांना त्यांच्या हृदयावर जर कोणी हात ठेवून पाहिलें असतें तर तिथें विलक्षण धडधड चाललेली आहे हें त्याला कळून चुकलें असतें. कसल्यातरी भयद कल्पनेनें त्यांचा नुसता थरकांप झाला होता.

तशा स्थितींतच ते पडवीवरून खालीं उतरले अन् एका विशिष्ट दिशेनें चालूं लागले. त्यांनीं पायात वहाणाहि घातल्या नाहींत. ज्या वाटेनें ते चालले होते त्या वाटेला ओळीनें एकामागून एक अशीं चार पांच घरें होतीं. वाळलेल्या पाचोळ्यावर वहाणेचा पाय पडला नि एकदम 'चर्रर्र' असा आवाज झाला आणि त्या आवाजानें जागें होऊन कोणीतरी आपणास हटकलें तर नसती पंचाईत व्हायची या भीतीनें त्यांनीं वहाणा न घालण्याचा दूरदर्शीपणा केला होता. अगदीं दबत छपत हलक्या पावलानीं त्यांनीं तीं घरें ओलांडलीं. आणि नंतर त्यांना थोडासा धीर आला.

माणूस हा भुतें खेतें किंवा हिंस्र पशु यांच्यापेक्षां माणसाला अधिक भितो हेंच खरें !

मास्तर आतां ज्या वाटेनें जात होते ती वाट जेमतेम दोन फूट रुंदीची होती. त्याच वाटेला पुढें अर्ध्या मैलाच्या अंतरावर कुळवाड्यांचीं घरें होतीं. दहाबारा घरें जवळजवळ असलेला तो एक लहानसा कुळवाडयांचा वाडा होता.

मास्तरहि त्या वाडयावरच चालले होते. अशा अंधाऱ्या रात्रीं तिकडे जाण्यासाठीं कोणी दहा रुपयांचें बक्षीस लावलें असतें तरी इतरवेळीं मास्तरांनीं घरांतून पाय बाहेर काढला नसता. दुतर्फा मोठमोठीं झाडें, एका बाजूनें कोल्हे नी भाल्ू ओरडायच्या तर दुसऱ्या बाजूनें वृक्षाच्या शेंडयावर बसून घुबडानें आपलें 'घूऽ घूऽऽ' चें संगीत चालू करायचें. एखादं लहानसं वावरूंहि भेटणे अशक्य नव्हतं त्या ठिकाणीं. वरच्या बाजूच्या डोंगरावरून रानडुकरांची टोळीहि 'होक्, होक्' करीत भाताच्या पिवळ्या धमक शेतावर ताव मारायला जातांना आढळायची. पण या सगळ्या गोष्टी माहीत असून अन् मनांत भय वाटत असूनहि मास्तरांचें पाऊल मात्र पुढे पुढेच पडत होतें. शंभर पावलें चालल्यावर हातांतल्या टॉर्चचा उजेड पाडून ते पुढची वाट न्याहाळून घेत नी पुन्हां टॉर्च बंद करीत.

थोडयाच वेळानें ते कुळवाडयांच्या त्या वाडयावर आले. तो सबंध वाडा यावेळीं निःस्तब्ध होऊन निद्रासुखाचा आस्वाद घेत होता. दिवसभर रानांत कष्ट करून आलेले श्रमजीवी लोक ते. आंथरुणाला पाठ लागतांच ते पूर्णपणे झोपी गेले होते. त्यांच्या आंगणात बांधलेलीं

गुरेंहि स्वस्थपणे रवंथ करीत बसलीं होतीं. वाड्यावरचीं कुत्रींहि आपल्या देहाच्या मोटळ्या करून परशाजवळ पडून राहिलीं होतीं.

वाड्यावरची ही नितांत शांतता पाहून मास्तरांना हायसें वाटलें. तिचीच अपेक्षा करीत होते ते. एका लहानशा केमळ्याच्या घराशीं येताच ते दरवाजांत येऊन थबकले.

घराचें दार बंद होतें. पण आंत परसा पेटत होता त्याचा अंधुकसा प्रकाश फटींतून बाहेर येत होता.

अगदीं दाराजवळ तोंड नेऊन मास्तरांनीं हांक मारली, "रायू!"

रायू हा एक लोहार होता. लोहारकामाबद्दल त्याची जेवढी प्रसिद्धी होती त्याहींपेक्षां 'वैद्य' म्हणूनच तो आजूबाजूच्या गावांत अधिक प्रसिद्ध होता. अनेक झाडपाल्याचीं औषधें त्याला माहीत होतीं. त्याच्या बटव्यांत लहानमोठ्या अनेक मुळ्यांचा नी फळांचा संभार असायचाच. पणजीच्या मोठमोठ्या डॉक्टरांनींहि ज्यांच्यापुढे हात टेकले, असले विचित्र अन् असाध्य रोग आपण अवघ्या सात दिवसांत बरे केले आहेत असें तो आपल्याकडे औषधासाठीं येणाऱ्या लोकांना छाती फुगवून सांगे. अन् गरजूपणानें त्याच्याकडे आलेले रोगी, त्याला धन्वंतरीचा धाकटा भाऊच मानीत. लोहारकामापेक्षां हा दुय्यम धंदाच त्याला अधिक किफायतशीर होत होता. दोन दिवस श्रम करून एखादें हत्यार तयार केल्यावर जेमतेम त्याचे आठ बारा आणे मिळायचे. पण बटव्यांतून एखादी मुळी काढून देतांच औषधाला आलेला माणूस खुषीनें सहज त्याच्या हातावर चार आठ आणे ठेवून जाई. अन् रोगी बरा झाल्यानंतर बक्षिसी मिळे ती वेगळीच. आतांच

एका गांवकाराच्या बायकोला बाळंतरोगावरचें औषध देऊन तो घरीं आला होता. अजून त्याला झोप लागली नव्हती.

कोणीतरी हाक मारीत आहे हें ऐकून त्यानें दार उघडलें.

— कोण मास्तर ? अन् एवढ्या रात्रीचे कुणीकडे ?

— आलों सहजच.

— या. आंत या कीं.

मास्तर आंत गेल्यावर एक लहानसें फळकुट रायूनें बसण्यासाठीं पुढें केलें अन् तो परशाजवळ बसला. उशालगतची भली लांब विडी मुठींत धरून त्यानें ती परशांतल्या जळत्या कोलितानें पेटवली अन् एक सपाटून झुरका मारून तो खोकूं लागला.

— मास्तर, इतक्या रात्रीचे तुम्ही इकडे आलांत याचं आश्चर्य वाटतं.—रायू म्हणाला.

— तुझ्याकडे काम होतं थोडंसं.

— माझ्याकडे ? कसलं जी ?

— काम फार नाजुक आहे. तें षट्कर्णी होऊं नये म्हणूनच या वेळीं मी तुझ्याकडे आलों. चल आपण जरा बाहेर जाऊं म्हणजे मग सांगतों तुला.

मास्तर लगेच उठून दाराबाहेर आले. त्यामुळें रायूलाहि बाहेर यावें लागलें. मास्तरांच्या पाठीमागून जात असतां रायूच्या मनाची उत्सुकता कमालीची वाढली होती. ' या मास्तरचं इतकं गुप्त काम काय बरं असेल ?'

दोघेहि तिथून एक फर्लांग अंतर चालून एका काजीच्या

झाडाखालीं थांबले.

— रायू, मी आज एका दुर्धर संकटांत सांपडलों आहें. यावेळीं माझं रक्षण करणं केवळ तुझ्या हातांत आहे ! तूंच या प्रसंगीं माझा त्राता—

— मी जी काय ? गरीब माणूस ! पुन सांगा तरी...माझ्या हातून होईल तें करीन मी !

— मला एक औषध पाहिजे तुझ्याकडचं.

या एकाच वाक्यावरून रायू काय उमगायचें तें उमगला. अंधार होता म्हणून. नाहींतर रायूचे डोळे यावेळीं एका विशिष्ट भावनेनें चमकले हें मास्तरांना दिसल्यावांचून राहिलें नसतें. अशावेळीं असल्या एकांतांत नेऊन औषध मागणारे लोक कोणत्या रोगावर औषध मागतात तें त्याला आजवरच्या अनुभवानें पूर्ण ठाऊक झालेलें होतें. तशा त्या अंधारांतच रायूनें एकवार मास्तरांचें आपादमस्तक निरीक्षण केलें.

'कुठंतरी भानगड केलेली दिसते या मास्तरानं' रायू मनांतल्या मनांत म्हणाला. तरीपण आपणाला कांहीं कळलेंच नाहीं अशी बतावणी करून तो बोलला,

— औषध पाहिजे ? कोणाला तापबीप आला आहे कीं काय ? का करटगळू असलं कांहीं झालं आहे ?— रायू कांहीं कमी नव्हता विक्षिप्त.

— मला एका निराळ्याच कारणासाठीं औषध पाहिजे— मास्तरांचे पुढील शब्द आंतल्याआंत घुटमळूं लागले. एकदोन मिनिटें अशी भीषण स्तब्धतेंत गेल्यावर मास्तरांनीं मनाचा हिय्या करून रायूच्या

कानांत कांहींतरी सांगितलें.

त्यासरशीं रायू एकदम दोन हात मागें सरकला.

— वाः मास्तर ! असलेहि चाळे सुरू केलेत का ? कुठें काय झालं तें तरी सांगाल कीं नाहीं ?

— नांव कसं सांगूं मी ?— मास्तर शरमाईच्या स्वरांत म्हणाले.

— नका सांगूं बिचारे. मला काय करायचं आहे दुसऱ्याच्या नसत्या उठाठेवी करून ? तुम्ही आतां औषधच मागायला आलांत म्हणून आपलं विचारलं.

हे उपहासव्यंजक शब्द मास्तरांच्या काळजाला चांगलेच झोंबले. हा बेरड नांव सांगितल्यावांचून आपली कांहीं डाळ शिजूं देणार नाहीं ही खात्री झाल्यामुळें निरुपाय होऊन मास्तरांनीं ते नांव उच्चारलं—

— नर्मदावहिनी !

— ऑं ? वामनरावांची भावजय कीं काय ?

— होय !

— भले मास्तर ! फार चांगलं कृत्य केलंत. घाटावरून शाळा चालवण्याकरतां म्हणून इकडे आलांत, वामनरावांनीं तुम्हाला आपल्या घरीं ठेवून घेतलं अन् तुम्ही मात्र त्या कुटुंबाच्या अब्रूवर उठलांत. छान ! छान !! खाल्ल्याघरचे वांसेच मोजून राहिलां नाहीं तुम्ही ! चांगली आगच लावलीत कीं !

— काय करायचं ? भयंकर चूक झाली ती माझ्या हातून. म्हणूनच तुझ्याकडे आलों. कृपा करून तूं औषध दिलंस तरच आमची सर्वांची अब्रू सुरक्षित राहील.

— म्हणजे हें बरं सांगतां मास्तर तुम्ही. तुम्ही एक जें करूं नये तें केलंत अन् आतां मला गरीबालाहि गोत्यांत आणायला बघतां होय ? मी नाहीं बुवा असल्या फंदांत पडणार. असलीं औषधं द्यायचा धंदा सोडून दिला आहे मी हल्लीं. हो, फट् म्हणतां ब्रह्महत्या पाठीस लागायची. हल्लीं सरकारचे कायदे कानू फार भयंकर झाले आहेत. तुम्ही व्हाल नामानिराळे, एखादे वेळेला इंग्रजी हद्दींत पळून सुद्धा जाल अन् जर का सरकारला थोडासा सुगावा लागला तर मला मात्र खडी फोडायला जावं लागेल. मग काय माझीं कच्चींबच्चीं पोसायला तुम्ही येणार होय ? असलं नका सांगूं मला कांहींतरी !

रायू महा बेरकी माणूस होता. सावज पूर्णपणें जाळ्यांत पकड-ण्यासाठीं त्यानें यावेळीं मोठ्या सभ्यतेचा अन् शिष्टपणाचा आव आणला.

— रायू, असं करूं नको. एकवार माझ्यावर दया कर. मी विलक्षण पेंचांत सांपडलों आहे रे !. माझं सोड, मी पुरुष आहें, अन् सडा फटिंग आहें. आतांच इथून निघून गेलों तर माझं कोण काय करणार ? पण ती बिचारी निराधार आहे......

— मग चला कीं तिलाहि तुमच्या बरोबरच घेऊन. वेताळाला नाहीं बायको अन् भावकादेवीला नाहीं नवरा......! चला. असल्या गोष्टी मला सांगूं नका. मी जातों आतां झोंपायला. फार थकलों आहे मी आज. चार कोस चालून आलों आहे. रामपाऱ्याला उठून मला धंद्याला लागलं पाहिजे.

अन् खरोखरच रायू तिथून जायला निघाला !

मास्तरांची जीभ कोरडीच पडली त्यामुळें. रायू इतका खट नि

खवचट असेल अशी त्यांची कल्पना नव्हती. आतां कांहींतरी हिरण्य-श्राद्ध केल्यावाचून नत्यंतर नाहीं हें त्यांनीं ओळखलें.

मास्तरांनीं पुढें होऊन रायूला अडवलें अन् कडोसरीचे कलदार दहा रुपये अलेंबलें त्याच्या मुठींत कोंबले.

— माझ्याकडे होते तेवढे हे रुपये मी तुला दिले आहेत. माझं हें काम केलंस तर आणखीहि कांहीं तुला देईन मी. पण आतां नाहीं म्हणूं नको. ही माझ्यावर...एका ब्राह्मणावर...दया कर अन् तुझं तें औषध दे!!

रायूच्या मुठींत त्या दहा रौप्यमुद्रा चमकत होत्या अन् त्याचे डोळे विजयोत्साहानें चकाकत होते. इतके रुपये मिळतील हें स्वप्नांतसुद्धां नव्हतें त्याच्या.

— मास्तर, तुम्हीं आतां इतकं गयावयां करतां; मग तुम्हांला नाहीं कसं म्हणायचं? औषध देतों मी तुम्हाला. पण माझं नांव मात्र कोणाला सांगूं नका. समजलं ना?

— देतोस ना, दे तर! आत्तां दे!!— मास्तरांचे पंचप्राण उतावीळ झाले होते.

— आतां एवढ्या रात्रीचं कुठून देऊं? सकाळीं अगदीं झुंजुमुंजु व्हायच्या आंत औषधाची पुरचुंडी तुमच्या हातांत आणून देतों, त्याचा एक करटीभर रस काढून पाजलात कीं काम फत्ते. आतां तें सगळं माझ्यावर लागलं. तुम्ही कांहींच काळजी करू नका.

— अगदीं नक्की ना?

— नक्की. तुम्ही खुशाल जाऊन झोपा आतां स्वस्थ. पण हें पहा

आतां याच्यापुढं मात्र—

मास्तरांना वाटलें, या हलकटाचा गळा दाबून जीव घ्यावा किंवा निदान पायांतील वहाण काढून थोबाडतरी सडकून काढावें. पण करतात काय! अडला हरि—!

दुसऱ्या दिवशीं दुपारीं ही गुणगुण गावांत सगळीकडे पसरली. गांव म्हणजे केवढेंसें! अवघीं १५–२० घरें. ज्याच्या त्याच्या तोंडीं हाच विषय सुरू झाला.

मारणाराचा हात धरवेल; पण बोलणाराचें तोंड कसें धरायचें! या प्रकारावर चर्चा करतांना जो तो सवाई मल्लिनाथी करूं लागला. त्यांतून बायका तर विशेष. एका दीन गतभर्तृकेची अब्रु चव्हाट्यावर आणण्याची ही आयती आलेली पर्वणी त्या कां म्हणून वायां दवडतील!

– छाऽऽन केलंन हो बाईनं! चाळीस वर्षांची म्हातारी झाली अन् आतां ह्या वयांत हे थेर सुचले......

– काय बाई एकेक ऐकावं तें नवलच. कलियुग आहे हें......

– नाहींतरी मला वाटलंच होतं हो, ही ढालगज भवानी असले कांहींतरी दिवे पाजळणार म्हणून.........

– अन् तो मास्तरडा तरी काय? घाटावरून आला न् आमच्या गांवाची अब्रू घालवलीन् ×× च्यानं! काय अघोर कर्म तरी! नर्मदा त्याला थोरली बहीण शोभेल.

जिकडे तिकडे हे अन् अशा प्रकारचेच जनापवाद उठूं लागले.

पण एकाच्याहि मनांत असं आलं नाहीं कीं अवघ्या बाराव्या वर्षी विधवा होऊन जीवनांतून उठलेल्या, सर्व सुखांना पारख्या

झालेल्या नर्मदेच्या हातून जर एखादा नैतिक अपराध घडला तर तो निदान अनुकंपनीय आहे.

दुसऱ्यानें चांगलें असावें, सदाचरणी असावें असें सगळ्यांनाच वाटतें. दुसऱ्याच्या हातून कांहीं चूक झाली तर तीहि चटकन् आपल्या डोळ्यांत भरते. पण त्याच वेळीं आपण अंतर्मुख होऊन स्वत:कडेच शोधकपणे पाहूं तर—!

मास्तरांना वाटलें होतें, रायूकडे गेल्यानें आपल्यावरचें अरिष्ट टळेल. पण रायूनें दुसऱ्या दिवशीं औषध तर दिलें नाहींच पण एक निराळीच कारवाई करून त्यानें मास्तरांचा विश्वासघात मात्र केला.

दुसऱ्या दिवशीं मास्तर शाळेंत गेल्यावर रायू तडक वामनरावांच्या घरीं आला अन् त्यानें रात्रीची सर्व हकीगत वामनरावांना सांगितली. आणि हेंहि सांगायला तो विसरला नव्हता कीं, मास्तर मला दहा रुपये देऊं करीत होते, पण आपण त्यांचें म्हणणें मानलें नाहीं अन् त्यांच्या एका पैलाहि शिवलों नाहीं.

मास्तरांचे दहा रुपये आरामशिरपणें पचवून रायूनें त्यांना अशी टांग मारली अन् त्यामुळेंच आज या गोष्टीचा गांवभर बभ्रा झाला.

अर्थात मास्तरना या प्रकाराची कल्पनाहि नव्हती. आज शाळेंतून वामनरावांच्या घरीं येतांना लोकांचे कुत्सित दृष्टिप्रहार त्यांना घायाळ करीत होते. घरीं जातात तों काय, तिथें होमकुंडच पेटलेलें.

माजघराच्या एका कोपऱ्यांत नर्मदा मुळमुळ रडत बसली होती. तिचे केस अस्ताव्यस्त झाले होते. चेहरा अगदीं उतरून गेला होता अन् डोळे रडून रडून सुजले होते.

थोड्याच वेळापूर्वी वामनरावांनीं तिला चांगलेंच बोलून घेतलें होतें. नाहींनाहीं ते शब्द बोलून तिच्या हृदयावर मर्मांतक प्रहार केले होते त्यांनीं! तिच्यावरून तिच्या आईबापांचा उद्धार करायलाहि वामनरावांनीं कमी केलें नव्हतें. अन् वामनराव अशा रितीनें तिच्यावर दुःशब्दांची बातेरी करून बाहेर गेले तरी वामनरावांच्या अर्धांगी—नर्मदा वहिनींच्या पूज्य जाऊबाई तिच्यावर खोचक वाग्बाण सोडीतच होत्या.

अन् अशा स्थितींतच मास्तर ओटीवर चढले. इंगळासारखे लाल डोळे करून वामनराव त्यांच्यावर कडाडले,

— मास्तर, या असे माझ्यासमोर या.

वाघापुढें जशी गाय मान टाकते तसे मास्तर त्यांच्यासमोर उभे राहिले.

— तुम्ही इतके कर्मचांडाळ असाल अशी जर मला कल्पना असती तर मी तुम्हांला माझ्या घराच्या वाऱ्यालासुद्धा उभं राहूं दिलं नसतं. अनाथ—बेकार अशा स्थितींत तुम्ही देशावरून गोव्यांत आलांत. मी तुम्हांला इथे शाळा उघडून दिली. अन् रहायला माझ्या घरीं जागा दिली. पण तुम्ही कृतघ्न निपजलांत. उपकारकर्त्यावरच उलटलांत. तुमच्यामुळं आज मला बाहेर तोंड काढायला जागा उरली नाहीं. सगळे लोक माझ्या तोंडावर थुंकतील आतां. आमच्या कुळाच्या अब्रूवर डांबर फासलंत तुम्ही, इतकंच नव्हे तर एका भाबड्या बाईचा केसानं गळा कापलांत. या तुमच्या अघोर पापकर्माबद्दल माझ्या मनांत असतें तर तुम्हाला पोलिस चौकीवर नेऊन रेजिदोरकडून यथास्थित फटकेच दिले असते. पण तसं करण्यांत तुमच्याबरोबर माझंहि नांव कलंकित

होणार म्हणून मी त्या मार्गाला जात नाहीं. ती तुमची वळकटी अन् ट्रंक आंगणाच्या कडेला ठेवली आहे ती उचला अन् रस्ता फुटेल तिकडे चालते व्हा. एक क्षणभरसुद्धा हें काळं तोंड घेऊन माझ्या-समोर राहूं नका !

वामनराव आवेगाने बांकावर बसले अन् त्यांनीं उजव्या बाजूला पडलेली चंची डाव्या बाजूला जोराने आपटली आणि त्याचवेळीं घरां-तून ऐक जोराचा हुंदका बाहेर ऐकूं आला.

सूर्यास्त होऊन गेला होता. हळू हळू अंधार पडूं लागला होता.

दिवसभर रानांत चरायला गेलेलीं गुरें घरीं येत होतीं. पक्ष्यांचे थवेच्या थवे अंतराळांतून द्रुतगतीनें आपापल्या घरट्यांकडे जात होते. कावळेहि कावकाव करीत माडांच्या शेंड्यावर येऊन बसत होते. कुळा-गरांत काम करण्यासाठीं आलेल्या कुळवाड्यांच्या बायका सर्पणाचे लहान भारे डोक्यावर घेऊन हंसत खिदळत घरीं निघाल्या होत्या.

पण याच वेळीं डोक्यावर ट्रंक अन् काखेंत वळकटी घेऊन जड पावलांनीं वामनरावांच्या घरांतून बाहेर पडलेले मास्तर कुठें बरें जात होते—?

• ० ०

मास्तर निघून गेले. पण वामनरावांच्या घरीं ती रात्र सगळ्यांनींच विचित्र मनःस्थितींत काढली. नर्मदेच्या बाबतींत पुढें काय करायचें तें उद्यां ठरवूं अशा कल्पनेनें वामनरावांनीं आंथरुणावर अंग टाकलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून पहातात तों नर्मदावहिनी कुठें दिसली नाहीं त्यांना.

तिचें आंथरूण गुंडाळलेलें होतें. अन् वळकटीच्या खालीं सहज दिसून येईल असें एक पत्र होतें. वामनरावांनीं कांपऱ्या हातांनीं तें पत्र उचललें अन् त्याची घडी उलगडली. पत्र पुढीलप्रमाणें होतें.

" कृ. सा. न. वि. वि.

" हें पत्र तुमच्या हातीं मिळेल तेव्हां मी तुमच्या घरापासून कांहीं तरी चार पांच कोस लांब गेलेली असेन. इतउप्पर माझें हें काळें तोंड तुम्हांला कधींहि दाखवणार नाहीं या निर्धारानं मी घराबाहेर पाऊल टाकलं आहे. 'मग पत्राची ध्वजपताका तरी कशाला इथें फडकवून गेलीस' असं तुम्ही म्हणाल, तर सांगतें. या पत्रांत आज-वरचं माझं जीवन कशा प्रकारें गेलें हें मी तुम्हांला सत्यस्वरूपांत कथन करणार आहें. माझ्या आजच्या या कलंकित स्थितीला अंशतः तुम्हींहि कारणीभूत आहांत हें तुम्हाला या पत्रावरून कळून येईल. अर्थात् तुमची सदसद्विवेकबुद्धि जागृत असली तरच.

" वयाच्या बाराव्या वर्षीं माझ्यावर वैधव्याचा घाला पडला. हाता-तोंडाशीं आलेला वडील भाऊ गेला म्हणून तुम्हीं सगळीं रडलांत, पण जिवंत असलेल्या मजबद्दल तुम्ही एक दिवस तरी चिंता केलीत का? उलट सासूबाईनीं तर 'याच अवदसेनं माझ्या पोराला मारलं' म्हणून मरेपर्यंत मला छळून छळून खाल्लं. सासूबाई गेल्यावर तोच कित्ता जाऊबाईनीं—तुमच्या बायकोनं—गिरवला, मोलकरणीसारखीं सगळीं कामं उपसायचीं, घालतील तें खायचं, बोलतील तें सहन करावयाचं अन् कोणाला उलट उत्तर द्यायचं नाहीं अशा बाण्यानं लग्नानंतरचीं पंधरा वर्षें मी तुमच्या घरीं काढलीं. माणसाला इतर कांहीं नसलं तरी

निदान सुखाचा शब्द तरी हवा असतो हें जर तुम्हाला पटत असलें तर एवढ्या पंधरा वर्षांच्या दीर्घ कालावधींत तुम्ही चुकून तरी एखादा गोड शब्द बोललां आहांत का माझ्याबद्दल? पहा आठवण करून. उलट बायकोच्या सांगण्यावरून पुष्कळ वेळां लाल डोळे करून खेंकसलां आहांत मात्र. घरांत ज्याला काडीइतका मान नाहीं त्याला बाहेर शेजारींपाजारीं कोण विचारणार? भलत्या सलत्या चहाड्या सांगून शेजाऱ्यांचं मतहि मजविषयीं कलुषित करून ठेवायला तुमच्या अर्धांगीनं कमी केलं नाहीं. घरीं दारीं माझी उपेक्षा चालली होती. तिरस्कार होत होता.

"एक वर्षापूर्वी मास्तर आमच्या घरीं आले. प्रथम दोन महिने मी त्यांच्याकडे बोललें नाहीं कीं धड पाहिलेंसुद्धां नाहीं. पण अवघ्या दोनच महिन्यांत ते आपल्या गोड स्वभावानं घरच्या माणसांत मिसळून गेले. मास्तर म्हणजे कोणी परके आहेत असं तुम्हांलासुद्धां वाटेना. ते इतरांशीं जितके गोड होते तितकेच माझ्याशींहि होते. ते पुष्कळ वेळां माझ्याशीं घटका घटका गोष्टी बोलत बसत. त्यांनीं माझ्याबद्दल एक दिवसहि तुच्छता दाखवली नाहीं. बोलण्याचालण्यांत माझ्याविषयीं ते आदरच व्यक्त करीत. घरांत सगळ्यांपेक्षां मीच अधिक राबतें हें त्यांच्या सहानुभवी दृष्टीला दिसे. अन् म्हणूनच ते पुष्कळ वेळां माझ्या कामांत मला मदत करीत.

"एक दिवस ते मला म्हणाले,—वहिनी, तुमच्या काबाडकष्टांपुढें कमाल आहे हं. तुम्हांला आळस कधींच येत नाहीं का? जेव्हां पहावं तेव्हां कांहींतरी तुमचा उद्योग चालू असतोच. मी तर नवसच केला आहे कीं वहिनी ज्या दिवशीं रिकाम्या रहातील त्या दिवशीं मारुतीला

एक पैशाची खडीसाखर खायची." या त्यांच्या नुसत्या गोड शब्दांनीं मला किती बरं वाटलं त्याची तुम्हाला कल्पनाहि येणार नाहीं. एक दिवस सुपारीच्या शिपट्यांचं ओझं घेऊन मी कुळागारांतून घरीं येत होतें. पाटींत शिपटीं इतकीं भरगच्च भरलीं होतीं–जाऊबाईनींच भरलीं होतीं तीं—कीं माझी मान लटलट कांपत होती अन् पावलंहि सरळ पडत नव्हतीं. मास्तरांनीं तें पाहिलं अन् पाठीमागून येऊन अलगद चारपांच शिपटीं काढून घेतलीं. ओझं कमी कां झालं म्हणून मी मागं वळून पहातें तों कमी झालेला भार मास्तरांच्या डोक्यावर चढला होता.

" — मान मोडून घ्यायची आहेवाटतं !— ते हंसत हंसत मला म्हणाले. ईश्वरानें येऊन वरदान द्यावें तसे ते शब्द वाटले मला. एवढं सगळं ते करीत होते पण त्यांच्या वागणूकीच्या बुडाशीं कसलाच वाईट हेतु नव्हता. त्यांची दृष्टीहि शुद्ध होती. पुरुषांची विषारी आसक्त नजर बायकांना अचूक ओळखतां येते. त्यांची ती सदा हांसरी मुद्रा पाहून माझं अंतःकरण मात्र त्यांच्याकडे ओढ घेत होतं. ही ओढ कशाची हें माझं मलाच कळत नव्हतं. माझ्या आजच्या दारुण अवस्थेचा पाया ज्या दिवशीं रचला गेला ती काळरात्र मला अजूनहि आठवते अन् माझं सर्वांग शहारून जातं.

" जाऊबाईनीं त्या दिवशीं माझ्यावर यथेच्छ तोंडसुख घेतलं होतं. त्या दुःखाच्या तिरीमिरींतच लहानग्या पडवींत आंथरूण टाकून मी झोपलें होतें. आंतल्या खोलींत चाललेला तुम्हा दोघांचा हास्यविनोदही माझ्या कानावर आदळत होता. माझ्या मनांत तीव्रतेनं विचार आला, जाऊबाई आज एवढी नाचते ती कोणाच्या जिवावर ? केवळ

नवऱ्याच्या! माझं जर कपाळ फुटलं नसतं तर! काय बिशाद लागली होती कोणाची माझा अपमान करायची! अन् आज माझी जाऊ जीं सुखं, जो आनंद लुटते तोच आनंद मलाहि........

" या विचारांसरशीं माझ्या अश्रूंचा बांध फुटला. तो रडण्याचा आवेग मला कांहीं केल्या आवरेना. मास्तरांनीं बराच वेळ माझं रडणं ऐकलं अन् ते माझ्याजवळ आले.

" – वहिनी, काय झालं तुम्हाला? रडतां कां?– त्यांनीं आर्जवी स्वरांत विचारलं.

" त्यामुळं तर मला अधिकच भडभडून आलं.

" – असं काय बरं करतां? रडं थांबवा पाहूं आधीं. असं वेड्यासारखं रडूं नये माणसानं!– मास्तर माझी समजावणी करूं लागले.

" एकाएकीं बेभान होऊन मी मास्तरांच्या गळ्याला मिठी मारली! त्यावेळीं माझ्या विवेकशक्तीचे सारे बंध तटातट तुटून पडले. कसलंच भान उरलं नाहीं त्यावेळीं मला. त्यावेळचा तो माझा पैशाचिक उन्माद–

" त्या निरागस तरुणाला मी कलंकित केलं...माणसांतून उठवलं! त्याच्या तोंडचा घांस मी दुष्ट कृत्येनं काढून घेतला.

" भाऊजी! मी तुम्हाला माझा जीव तोडून सांगतें, जगांत पवित्रांत पवित्र जें असेल त्याची शपथ घेऊन सांगतें कीं झालेल्या प्रकारांत मास्तरांचा मुळींच अपराध नाहीं. अपराधी–सर्वस्वी अपराधी–मी चांडाळीण आहें!

" शेवटीं तुमच्या पायाशीं एवढीच भिक्षा मागतें कीं, मास्तरांचा शोध करा अन् पूर्वीप्रमाणंच त्यांना तुमच्या घरीं आश्रय द्या. तुमचेच

ते एक गरीब भाऊ आहेत असं समजा. ही माझी अखेरची विनंती आहे तुम्हांला. यापुढं ही तुमची करंटी वहिनी जन्मांत कधींसुद्धां तुमच्याकडे कांहीं मागणार नाहीं! एवढी एकच भिक्षा मला घातलीत कीं कसल्याहि नरकमय परिस्थितींतून मी तुमचं कल्याण चिंतीन! झालं! माझें कथन पुरे झालं.

"माझा शोध करण्याचा व्यर्थ खटाटोप करूं नका. त्यांत तुम्हाला यश येणार नाहीं. मी आत्महत्या करणार नाहीं ही खात्री बाळगा.

"तुम्हा सर्वांचं ईश्वर कल्याण करो!?

तुमचा संबंध तुटलेली

नर्मदा"

वामनरावांच्या हातून तें पत्र गळून पडलें अन् मटकन् खालीं बसून त्यांनीं आपलें मस्तक दोन्ही हातांनीं दाबून धरलें!

---

# चंडिका देवी

माझा पुण्याला रहाणारा एक मित्र त्या दिवशीं आमच्याकडे कांहीं दिवस रहायला येणार होता. आमचें गांव अगदींच खेडें असल्यामुळें तिथें मोटार सर्व्हिस नव्हती. गांवापासून तीन मैलांवर असलेल्या कोळसई या गांवापर्यंतच सर्व्हिसच्या मोटारी येत होत्या. तिथें उतरून मग आसपासच्या कोणत्याही गांवीं पायीं जावें लागे.

तूं अमुक तारखेच्या दिवशीं अमक्या मोटारनें कोळसईला ये, तिथें मी तुला उतरून घ्यायला हजर राहीन, असें मी शरद्‌ला कळवलें होतें. अन् मोटार साडेचारला येते हें ठाऊक असूनहि चार वाजल्यापासून मी कोळसईला एका सोडावॉटरच्या दुकानांत बसून उत्कंठापूर्ण नेत्रांनीं रस्त्याकडे लांबवर पहात होतों.

अगदीं मंडलीकांच्या वक्तशीरपणानें मोटार शिंग वाजवीत स्टॅंडवर येऊन थडकली.

कोणतेंहि अपरिहार्य कारण आड न येतां माझा मित्र शरद्हि मोटारींतून खालीं उतरला.

— काय धुळीनं लाल झाले रे सगळे कपडे ?— आपल्या कोटा-वरची धूळ हातरुमालानें झटकीत शरद् म्हणाला.

— माझ्या प्रिय मित्रा, गोमंतक आहे हें महाराष्ट्राचं नंदनवन. ऐकलीं नाहींस तूं मोठमोठ्या साहित्यिकांच्या तोंडचीं गोमंतकाविषयींचीं वर्णनं ? तुमच्या पुण्यांतल्याच लोकांनीं नंदनवन म्हणून गौरव केला आहे या प्रांताचा ठाऊक नाहीं तुला ? सृष्टिदेवीचा लाडका प्रदेश आहे हा. तिनं या प्रांताच्या भूमीवर नुसता गुलाल उधळला आहे. नाहींतर तुमच्या पुण्याची ती काळी माती—

— नमस्कार मातीशास्त्र विशारद ! ती चर्चा आपण मागाहून साव-काशपणें करूं. तूर्तचा निकडीचा प्रश्न म्हणजे गरमागरम चहा. तो कुठें मिळेल तो पहा आधीं—अगदीं पोटच्या कळवळ्यानें शरद् मला म्हणाला.

कुठऱ्याशा तळ्यांतल्या तीन माशांची गोष्ट सांगतात, तसा मी कांहीं 'दीर्घसूत्री' नव्हतों. चांगला 'अनागत विधाता' होतों. माझा मित्र मोटारींतून खालीं उतरेल तेव्हां तो तहानभुकेनें व्याकुळलेला असेल याचा आधींच तर्क करून मी त्या प्रसंगाला तोंड देण्याची व्यवस्था करून ठेवली होती.

त्याच्या हातांत हात गुंफून मी त्याला घेऊन त्या सोडावॉटरच्या दुकानांत शिरलों. पुढें फणसाचें हिरवें गार झाड अन् मागच्या बाजूला माड अशा कल्पवृक्षांच्या आसऱ्याला तें दुकान होतें. त्यामुळें तिथल्या

त्या सुखद शीतलतेनें शरद अर्धाअधिक गार झाला.

— आः ऽऽऽ! किती बरं वाटलं रे!— हुश्श करीत त्यानें आपली टोपी काढून बाजूला फेकली अन् केसांवरून हळुवारपणें हात फिरवला.

लगेच माझ्या गड्यानें दोन रसरशीत शहाळीं आपल्या घोंगडींतून बाहेर काढलीं अन् कमरेच्या जाड दोरीवजा करगोट्यांत खोवलेली लहानशी कोयती खासदिशीं ओढून एका घावासरशीं त्या शहाळ्याच्या एका बाजूची ढब्बू पैशाएवढी चकती उडवली.

— घ्या दादानुं!— गडी तें शहाळें शरद्च्या पुढें करीत म्हणाला.

गंगोदकानें कांठोकांठ भरलेल्या रौप्यकलशाप्रमाणें तें शहाळें दिसत होतें. तें पाहूनच शरद्ची कळी उमलली. अन् त्याचें तें सुधामधुर पाणी घुटघुट पितांना आणि नंतर त्याच्यांतलें मऊ मऊ लवलवीत खोबरें खातांना जी निर्भय प्रसन्नता त्याच्या मुखावर खेळत होती त्यावरून त्याच्या अंतःसमाधानाचा तो कांहींहि न बोलतां मी अंदाज करूं शकलों.

— या नंदनवनांतलं हें अमृत बरं का!— मी म्हणालों.

— मग मी आतां अमर झालों असेन.

— हो. निदान या प्रांतांत आहेस तोंवर तरी.

अशा रीतीनें हास्यविनोद करीत आम्ही घरच्या वाटेला लागलों. शरद्ची बॅग अन् माझा पुढील सरबराईसंबंधीचा निरोप घेऊन गडी पुढें निघून गेला होता. अर्थात सूर्यास्तापर्यंत आम्ही घरीं पोचलों तरी चालण्यासारखें होतें.

मंद गतीनं आम्ही चाललों होतों. वक्त्याची भूमिका माझ्याकडे अन् श्रोत्याची त्याच्याकडे साहजिकच आली होती. तो जरी पुणेरी श्रोता असला तरी आपले तसले कांहीं सद्गुण यावेळीं तरी निदान विसरणंच भाग होतं त्याला. एकेक माहिती शक्य तेवढ्या काव्यमय भाषेत मी त्याला सांगत होतों नि वारंवार त्याचं कुतूहल जागृत करीत होतों.

पुढें सुमार दीड मैलावर रस्ता तयार करण्याचं काम चाललं होतं. शेंदीडशें स्त्री–पुरुष काम करीत होते तिथं. गटार खोदणं, रस्त्यावर माती टाकणं, ती सगळीकडे सारख्या प्रमाणांत पसरणं, अशा कामांत तो कामगारवर्ग अगदीं दंग होता अन् अर्धा चोळणा आणि फाटकी हॅट घातलेले एक दोघे मुकादम त्या मजुरांना शिव्या हासडण्याची सरकारी नोकरी इमानें इतबारें करीत होते.

त्या तयार होत असलेल्या रस्त्यावरूनच आम्ही पुढं चाललों होतों.

इतक्यांत घसकन् एक मातीची टोपली रस्त्यावर माझ्या पायाशींच टाकली गेली. मी थोडासा चमकलों अन् वर पाहिलं.

एक प्रौढशी कुळवाडीण रिकामी टोपली आपल्या डोक्यावरच्या चुंबळीवर नीट बसवून आपला उजवा दंड वर करून चोळीच्या कांठानं कपाळावरचा घाम पुशीत उभी होती.

चेहरा ओळखीचासा वाटला, माझं स्मृतियंत्र गरगरां फिरूं लागलं अन् एका मागच्या विशिष्ट कालखंडाशीं येतांच तें एकदम थांबलं.

— होय. तीच ही !— नकळत माझे ओठ पुटपुटले. ती बाई आपली

टोपली पुनश्च भरून आणण्यासाठीं मागें वळून चालूं लागली तरी मी मात्र सारखा तिच्याकडे पहात राहिलों.

माझं हें विचित्र वर्तन पाहून शरद्‌नं मला डिवचलं.

— असा काय वेड्यासारखा पहात होतास तिच्याकडे ?

— उगाच.

— कोण आहे रे ती बाई ?

— आहे नाहीं; होती !

— पण कोण ?

— देवी.

— मग अशी रस्त्यावर मजुरी कां करते !

— पोट जाळण्यासाठीं. दुर्दैवानं तिला आतां माणूस व्हावं लागलं आहेसं वाटतं.

— तुझं तिच्याकडे पहाणं जितकं विचित्र तितकंच आतांचं बोलणंहि विचित्र.

— विचित्र लीलाच आहे ती एक. चल, थोडं पुढं जाऊं. मग सांगतों तुला सगळं — मी म्हटलं.

आतां माझी दृष्टि समोरच्या रस्त्याकडे वळली. अन्—

— अरेच्या ! देवसुद्धां आहेच कीं बरोबर !— असा उद्‌गार माझ्या तोंडून बाहेर पडला.

— हा आणखी देव कुठला बुवा ?— शरद्‌नें विस्मित होऊन पृच्छा केली.

— समोर पहा. रस्त्याच्या मधोमध आलेलं झाडाचं खोड काढतो आहेना, तो कावळ्याचा रंग चोरून घेतलेला, कृश अन् टेंगणासा कुळवाडी. तोच देव. अन् आतां मागं वळ. सतरा ठिगळं लावलेल्या लुगड्याचा गुडघ्यांच्या वर कांचा मारलेली, गालफडं बसल्यामुळं डोळ्याखालचीं हाडं पुढं आलेली, स्त्रीजात असूनहि राकटपणांत पुरुषालाहि लाजविणारी, तिरळ्या डोळ्यांची, बगळ्याच्या मानेची, डोक्यावर मातीची टोपली घेऊन येणारी ती अभिजात स्त्रीमूर्ती पहा.

या दोन्ही प्राण्यांना नीट निरखून ठेव. 'वेष असावा बावळा, परि अंतरीं असाव्या नाना कळा' अशांतली आहे ही दुक्कल. पुढं जो इतिहास मी तुला सांगणार आहें त्यांतल्या पात्रांचं प्रत्यक्ष व्यक्तिदर्शन आहे हें असं समज.

त्याच दोन व्यक्तींबद्दल तुटक तुटक कांहीं तरी बोलत आम्ही आणखी थोडे पुढें गेलों.

आमच्या खेडवळ भाषेंत सांगायचं तर त्यावेळीं एक तास दिवस उरला होता. घरीं लवकर जायची घाई नसल्यामुळें आम्ही आमची वाट सोडून जरा बाजूला गेलों. जवळच एक लहानशी टेकडी होती. त्या टेकडीच्या माथ्यावर चढून आम्ही गवताच्या मृदुल आस्तरणावर बैठक ठोकली.

टेकडी लहानच खरी; पण ती उघडी बोडकी नव्हती. हिरव्या गार पर्णसंभारानें भरलेली दाट झाडी होती तिच्यावर. अस्ताचलाकडे जाणाऱ्या सूर्याचे तिरपे किरण पडल्यामुळें टेकडीवरचीं झाडेंझुडपें सोनेरी रंगछटेनें चमकत होतीं. आमच्या समोरच्याच एका झाडावर

दोन चपळ गोजिरवाण्या खारी आपल्या देखण्या शेपट्या फुलवून एक- मेकीशीं लपंडाव खेळत होत्या. बराच वेळ आम्ही त्यांच्या त्या लाडिक क्रीडेकडे पहात राहिलों असतों. पण एक पांढरा शुभ्र गुबगुबीत ससा कोणाच्यातरी भीतीनें चौखूर उड्या टाकीत आमच्या उजवीकडून डावी- कडे गेला, त्यानें आमचें लक्ष खेचून घेतलें.

टेकडीच्या दुसऱ्या बाजूला पायथ्याशीं एक ओढा वहात होता. आणि त्याच्या तटप्रांतीं विस्तारलेल्या केतकीच्या बनांतून येणाऱ्या वायुलहरी केवड्याचा उन्मादक सुगंध आमच्या घ्राणेंद्रियांत आणून सोडीत होत्या. ओढ्याच्या पलीकडच्या बाजूला केवढातरी भूमिभाग भातशेतानें व्यापला होता. वीतभर उंच वाढलेल्या त्या हिरव्या भाताच्या रोपांतून वारा खेळूं लागला, कीं ते सगळे शेत लव लव हाले. शेताच्या शेवटच्या टोकाला मोठमोठे माड होते नि ते शेताच्या बाजूला लावले होते. एकाद्या आजोबानें आपल्या नातवंडाचा गोडसा पापा घेण्यासाठीं खालीं वाकावें तसे ते दिसत.

शरद् ही निसर्गशोभा अतृप्त नेत्रांनीं पहात असतां कुठून तरी दोन चार बगळे येऊन त्या ओढ्याच्या काठीं बसले. त्यांना पाहून मी शरदूला म्हटलें.

— पाहिलेस हे बगळे ! कसे 'तटस्थ तें ध्यान' बसले आहेत बघ. एखादी मासोळी जलपृष्ठावर डोकावली, कीं चटकन झडप घालून तिला गिळंकृत करतील. तोंवर अगदीं नितांत स्तब्ध. पक्के संधिसाधू ! यांना उपमाच द्यायची तर कोणाची सांगूं का ! मघाशीं दाखवलेल्या त्या दुक्कलीची.

— माणसाला संधि क्वचितच मिळते अन् मिळाली तरी ती साधून आपलं बस्तान बसवून घेणारीं माणसंहि फार थोडींच असतात. अशा थोड्या लोकांपैकीं ती जोडी आहे.

माझ्या या बोलण्यावर शरद् म्हणाला.

— ए बाबा, माझी उत्सुकता आतां अधिक ताणूं नको. काय प्रकार आहे तो सरळ सांग एकदां. उगाच नमनाला घडाभर तेल कां जाळतोस ?

— बाबारे, ही वातावरणनिर्मिति आहे. लघुकथेचं तंत्र का काय म्हणतात तें वाचलं नाहींस का कधीं ? पण ही थट्टा जाऊं दे. मी मुख्य मुद्याकडे वळतों आतां.

'१९१८ सालची गोष्ट. इतर सगळीकडच्या सारखाच आमच्या गोमंतकांतहि इन्फ्लुएंझानं कहर मांडला होता. अर्थात् आमचं गांवहि त्याच्या तडाख्यातून सुटलं नाहीं. पटापट कित्येक लोकांनीं आंथरुणं धरलीं. तापकऱ्याचं आंथरुण नाहीं असं घर मिळणं दुरापास्त झालं.

'दिवाळीचा सुमार होता तो. शेतं पिकून अगदीं तयार झालीं होतीं. कापणीचा अन् मळणीचा हंगाम चालू होता. कित्येक माणसं शेतांत काम करतां करतांच तापाची हुडहुडी भरून तिथल्यातिथें पडत. ज्याला ताप येई त्याची बहुधा दोन चार दिवसांनीं कांहींतरी वाईट वार्ता कानावर येई. तापाचं आंथरुण म्हणजे बहुतेक मृत्युशय्याच ठरे ती. जो जगला त्या काळरोगांतून तो सुपाएवढ्या नशीबाचा ! कित्येक घरांत तर असे दुर्धर प्रसंग ओढवले आहेत, कीं पोर मरतं त्याची आईला शुद्धबुद्ध नाहीं अन् बायको मेली त्याची नवऱ्याला जाणीव नाहीं.

'आमचं गांव म्हणजे शेंशंभर घरांचं खेडं. ना वैद्य ना डॉक्टर. ज्याला जें सुचेल तें औषध तो तापकऱ्याला पाजी. एकादा आप्त इष्ट कोणी आजाऱ्याचं क्षेम कुशल विचारायला आला, कीं कर्णोपकर्णी ऐकलेलं कसलं तरी तापावरचं जालीम औषध सांगे. 'शेजारच्या गावांतला वझे ठाऊक आहे ना, त्याला हाच ताप आला होता. त्यानं म्हणे सपाटून दोन अडसरं खाल्लीं अन् दुसऱ्या दिवशीं खडखडीत बरा झाला न् काय? शेतावर कामाला सुद्धां गेला म्हणे' आणि असलं हें त्वरित गुणकारी रामबाण औषध ऐकून एखादा रोगी मागचा पुढचा विचार न करतां तें घेई अन् थोड्याच वेळांत कायमचा बरा होई. तुला काय सांगूं शरद्! असलींच सांगोवांगीचीं औषधं ऐकून आमच्या गावांतला एक धडधाकट पंचविशींतला तरुण भला मोठा गाडगा आंबट दहीं प्याला. अन् दुसरा एक तसलाच वेडा पीर, ओढ्याच्या पाण्यांत डुंबून बसला. त्याचं पर्यवसान जें काय व्हायचं तेंच झालं!

'कोणालाच आपल्या जिवाची शाश्वति वाटत नव्हती त्या दिवसांत. गावांत जिकडे तिकडे भकास वातावरण अन् मृत्यूची भेसूर छाया पसरली होती.

'आणि अशा स्थितींत एक दिवस सकाळीं प्रहर दिवसाच्या सुमाराला हीं दोघं, ती बाई अन् तो बुवा आमच्या गावांत प्रविष्ट झालीं!

'कसला तरी विचित्र घुमण्याचा आवाज येतो आहे असं ऐकून माणसं बाहेर येऊन पहातात तर मळकट कासटी नेसलेला, उघडा बोडका, शेंडी पिस्कारलेला एक कुळवाडी अन् कपाळभर कुंकवाचा मळवट भरलेली, केस पिंजारलेली आणि हातांत मोराच्या पिसांचा

कुंचा घेतलेली एक कुळवाडीण अशीं दोघं चमत्कारिक हातवारे करीत, घुमत, नाचत, हुंदडत, झोकांड्या खात रस्त्यानं जात आहेत असा हृदय कंपित करणारा देखावा दिसला.

'हें आणखी अरिष्ट कुठून आलं अशा समजुतीनं त्याचा छडा लावण्यासाठीं गावांतले कांहीं प्रतिष्ठित लोक, गांवकर, फौजदार हे त्यांच्या मागून जाऊं लागले.

'हीं दोघं जीं गावांतून निघालीं तीं गांवाबाहेर असलेल्या सांतेरीच्या देवळाकडे गेलीं.

'देवापुढें आसन ठोकून बसल्यावर अंगाला आळोखे पिळोखे देऊन, छाती पिटून, बुभुःकार करीत त्यांनीं अर्धा ताम जो कांहीं उच्छाद मांडला तो पुसूं नका. शंकराचं तांडवनृत्यसुद्धां इतकं रौद्र नसेल.

'थोडा वेळ गेल्यावर गांवकऱ्यानं त्यांना दबकत दबकत हळूच विचारलं,

'– तुम्ही कोण !

'त्या प्रश्नासरशीं पुन्हा जोरजोरानं घुमायला सुरवात झाली त्यांची.

'– आम्ही कोण...हुंः हुंः ऽ ऽ म्हणून विचारतोस? आम्ही... आम्ही...मीऽऽचंडिकादेवी. हुंः हुंः हूंऽऽऽ! आणिऽऽआणि हा जरीमरीचा मुलगा तापाचा देव.– त्या बाईनें शून्याकडे दृष्टि लावून उत्तर दिलं.

'– तुम्ही आमच्या गावांत कशाला आलां आहां?– पुन्हां गांवकाराचा प्रश्न.

'– हुंः हुंः तुमच्या गांवाचं रक्षण करायला. अरेऽऽ अरेऽऽ आम्ही

आतां कांहीं दिवस याच गावांत मुक्काम करणार आहों रेऽऽ! तुम्ही चिंता करूं नकारेऽऽ! इडापीडा दूर होईलरेऽऽ दूर होईल.—त्या बाईनं सांगितलं.

'गावांतलं वातावरण भीति, चिंता नि शोक यांनीं कुंद होऊन गेलं होतं. सगळ्यांची विवेकशक्ति, सारासार विचार पार मरून गेला होता. मनं दुबळीं झालीं होतीं. कोण काय सांगेल तें खरं वाटे. कोणावरहि विश्वास बसे. लहान मुलं तरी पुष्कळ वेळां शोधकपणा दाखवतात; पण तो सुद्धां गावकऱ्यांच्या मेंदूंत उरला नव्हता. बाईच्या तोंडचे ते धीराचे शब्द ऐकून ते आनंदानें बेहोष झाले. तीं दोघं म्हणजे 'अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली' म्हणतात ना, तशीं वाटलीं त्या लोकांना. 'आतां काय बिशाद आहे, इन्फ्लुएंझा आपल्या गावांत राहील! प्रत्यक्ष देव आल्यावर तापाचा बाप सुद्धां वाऱ्याच्या वावडीसारखा उडून जाईल' असं जो तो एकमेकांना म्हणूं लागला.

'आपण आपल्या गांवचं देवपण चांगलं राखलं आहे, आपण गांवच्या देवचाराला वगैरे चरुपिंड अन् कोंबडें वेळच्यावेळीं द्यायला चुकत नाहीं, म्हणून या संकटाच्या वेळीं देव धांवून आला आम्हाला अन् आमच्या पोराबाळांना राखायला. अशा अहंमन्य अभिनिवेशानं गांवकारांची छाती फुगून गेली अन् त्यानें आपल्या कल्लेदार मिशांना अधिकच पीळ भरला.

— देवी! सायबिणी! गावांत खूप लोक तापानं पडले आहेत.

ते लवकर बरे होतील ना ?—गांवकार देवीला सादर प्रणिपात करून विचारता झाला.

'—मी सांगेन तसं वागा रे ऽऽ! फुः! फुः! फुः!! एक पायली धान्य आणा. त्याची इथें रास करा. एक मातीचा घडा आणा. त्यांत पाणी भरा, फुलं, गंध, अक्षता त्याच्यांत घालून त्याची धान्याच्या राशीवर स्थापना करा. रोज पूजा करून त्याला नैवेद्य दाखवा. देवीला अन् या देवाला रोज पक्वान्नाचं भोजन घाला. साडी चोळी द्या. घटापुढं रोज दक्षणा ठेवा. म्हणजे गांवांतले सगळे तापकरी बरे होतील. फुः हु हु हु! चार दिवसांत कामाधामाला लागतील. फुः फुः हुः! गांवचा वेलविस्तार वाढेल. हुः हुः हुः ऽऽऽ!!

'देवीचा हा घूत्कारयुक्त आशीर्वाद ऐकून गांवकार पुढं आला अन् एकाद्या ईश्वराच्या प्रेषिताप्रमाणं गांवातल्या ब्राह्मण वर्गाला आदेश देता झाला.

'—आजपासून रोज एकेका घरांतून गोड गोड जेवणाचं ताट वाढून आलं पाहिजे. त्याच्या बरोबर आठ आणे दक्षिणा. पहिली पाळी आबाभटजींची. देवीच्या बडदास्तींत अन् सेवेंत कसलीच कसूर होतां कामा नये.

'देवीच्या सांगण्याप्रमाणें घटस्थापना झाली. प्रत्येक घरांतून बकासुराच्या पाळीसारखी ताटं भरून देवळांत येऊं लागलीं. चार दिवसांत देव अन् देवी यांची अंगकांति पालटली. 'तूप खाणाराचं रुप कधीं झांकलं आहे का?'

'रोज रात्रीं गांवकरी देवळांत जमून घटापुढं धूप जाळून घुमटं, समेळ अन् झांजा अशा वाद्यांच्या कडाक्यांत भजन करूं लागले. घटाला आरत्या म्हणूं लागले.

'भजन रंगांत आलं कीं—

' 'गोपाळांचे मेळीं सांवळा सांपडला वनमाळी' हा चरण हेल काढून उच्च स्वरांत म्हणत तीं दोघं आपलं अंग घुसळूं लागत. घुमतां घुमतां मध्येंच बेहोष झाल्यासारखं करून ती बाई आपलं अंग अस्ताव्यस्तपणें त्या बुवाच्या अंगावर टाकी. अन् तो तिला हळुवार हातानं कुरवाळी.

'अन् या ओंगळ वर्तनानं एकाद्याला हसूं आलं तर ती बाई आपल्या हातांतला कुंचा त्याच्या डोक्यावर मारी.

'अशा थाटांत रात्रीं अकरा बारा वाजेपर्यंत भजन चाले. भजनाला कोणीही गैरहजर राहिलेलें चालत नसे. जो न येईल त्याच्या नांवानं ती बाई हवी तसली शापवाणी उच्चारी.

'भजन आटोपून घरीं जातांना एक दिवस तिनं सगळ्या लोकांना ताकीद देऊन ठेवली होती.

'—रात्रीचे कोणी इकडे फिरकूं नका. मध्यरात्रीं इथें सगळ्या देवांची सभा भरते. तुम्ही पातकी लोक इकडे आलांत तर डोळेच फुटतील. खांचा होतील!

'देवीचं आगमन होऊन आठ दिवस झाले. पण जीं माणसं मरायचीं तीं मेलींच. तापानं पडायचीं तीं पडलींच.

'एखाद्या घरांत काहींतरी प्रसंग ओढवला अन् देवीला विचारायला गेला तर डोळे तांबडे बुंद करून रागानं फुस्कारत देवी उत्तर करी,

'–असं कां झालं म्हणून मला विचारतोस? तुझ्या घरांत अनाचार झाला. अरे ऽऽ अरे ऽऽ अनाचार झाला रेऽऽ! हुहुहुः!!–आलेला माणूस बिचारा तोंडांत मारल्यागत निघून जाई.

'अशा रीतीनं आणखी कांहीं दिवस गेले. देवीच्या रतिबांत कोणत्याहि प्रकारचा खंड नव्हता. तापाची साथ अधिकच वाढत होती. देवीच्या प्रभावाबद्दल, देवपणाबद्दल हळू हळू लोक साशंक होऊं लागले होते.

'गावांत एक विधवा बाई होती. थोडंसं कुळागर होतं; त्याच्यावर ती आपली गुजराण करी. तिला एकच मुलगा होता. असेल साधारण १५–१६ वर्षांचा. त्याला एक दिवशीं ताप आला. दोन दिवसांत भ्रम होऊन तो बरळूं लागला.

'अन् आंथरुण काखोटीस मारून बाहेर पळूं लागला.

'बाईच्या काळजाचा ठाव सुटला. ती रडत रडत सांतेरीच्या देवळांत या देवीजवळ आली.

'–देवी! पायां पडतें तुझ्या. माझ्या पोराला वांचव. पोर अगदीं कसंसंच करतंय ग! माझं एकुलतं एकच आहे तें. तुला सगळं ठाऊक आहे. त्याला वांचवलंस तर माझ्या कातडीचे जोडे करून तुझ्या पायांत घालीन. एवढी पोराच्या प्राणांची भीक घाल मला.

'देवी असेल नसेल तेवढा जोर करून 'धंततंति तंतडंति' असले निरर्थक शब्द घसा फुटेपर्यंत ओरडत पंधरा मिनिटेंपर्यंत घुमली. अन्

नंतर त्या बाईला म्हणाली.— पांच पुतळ्यांची माळ देवीच्या गळ्यांत घाल अन् मुलाला इथें माझ्या पायांशीं घेऊन ये. पहातें मी तो कसा मरतो तें. जा! जा!! मुलाला घेऊन ये. पुतळ्यांची माळ घेऊन ये.

'बाई तेथून वायुवेगानें घरीं आली. शेजारच्या एक दोघां गृहस्थांना आपल्या मदतीला बोलावलं तिनं. एकानं तिच्या मुलाला पाठुंगळीस उचलून घेतलं. दुसऱ्यानं पाठीमागून त्याची मान सांवरून धरली.

'तिच्या घरांत आठदहा पुतळ्यांची एक माळ होती. ती तिनं चटकन तोडली. त्यांतल्या पांच पुतळ्या वेगळ्या काढून त्या झटापट वाकाच्या दोऱ्यांत ओवल्या अन् ती मुलासह देवळांत आली.

'मुलाला देवीच्या पुढें निजवलं. तापानं नुसता फणफणत होता तो! त्याचं तोंड, नासारंध्र वगैरे सारं शुष्क शुष्क झालं होतं. डोळे खोल गेले होते.

'बाईनं देवीच्या गळ्यांत ती पुतळ्यांची माळ घातली अन् अश्रूपूर वाहवीत तिच्यापुढें नाक घासलं.

'देवीनं आसन घालून घुमायला सुरवात केली. तिचे ते विचित्र हातवारे अन् विचित्र शब्द ऐकून तो मुलगा घाबरला. 'आई, आई' म्हणून क्षीण आवाजांत तो सारखा हांका मारूं लागला. त्याचं हृदय धडधडूं लागलं.

'थोडा वेळ घुमल्यानंतर देवीनं घटांतलं पाणी सपासप त्याच्या तोंडावर मारायला सुरवात केली. नाकातोंडांत पाणी गेल्यामुळं मुलाचा जीव गुदमरला. 'आईगऽऽ!' म्हणून त्यानं एकच किंकाळी फोडली.

'मुलगा अर्धवट मूर्च्छित पडला; तरीहि देवीनं पाणी मारण्याचा सपाटा बंद केला नाहीं. आई सारखी 'नको, नको' म्हणून ओरडत होती. पण चंडिकादेवी असली भलतीच दया कां म्हणून करील? तिला त्या पोराला बरं करायचं होतं ना!

'पांच मिनिटं राहून राहून असे पाण्याचे हबकारे मारल्यावर देवी धीरगंभीर स्वरांत त्या बाईला बोलली,

'—जा जाऽऽ! बाई, मुलाला घेऊन जा. उद्यां सकाळीं त्याचा ताप निघेल. कांहीं घाबरूं नको. यम त्याला न्यायला आला होता. तुम्हाला दिसला नाहीं पण मला प्रत्यक्ष दिसला. मुलाच्या उशाजवळ बसला होता तो. मी पाणी मारून त्याला पळवून लावलं. बाई, आतां तुझा मुलगा खडखडीत बरा झाला. आतां यमाची छाती नाहीं त्याच्या जवळ येण्याची. जा उचला मुलाला. हु हु हुःऽऽऽ!

'आणलेल्याच माणसांनी मुलाला उचलून पुन्हां घरीं आणलं अन् अलगद आंथरुणावर निजवलं. पण...

'तो मुलगा नसून मुलाचं प्रेत होतं!

'त्या हतभागी आईनं हृदय पिटीत जमिनीवर लोळण घेतली.

'ज्यांनीं त्या मुलाला देवळांत नेलं अन् पुन्हा निष्प्राण अवस्थेत परत आणलं त्यांचं पित्त खवळलं या अनन्वित प्रकारानें.

'त्या शोकव्याकुल मातेचं सांत्वन करायला ते तिथें न थांबतां हातांत दांडकीं घेऊन बाहेर पडले.

'—कुठें निघालांत हो?— शेजारच्या घरांतल्या एका तरुणानं विचारलं.

'–देवाचं टाळकं सडकायला अन् देवीला मातींत गाडायला.–
त्यांनीं संतप्त स्वरांत उत्तर दिलं.

'–थांबा तर, मी पण येतों.–त्या तिसऱ्या तरुणानं कुंपणाचा एक खुंट मोडून हातांत घेतला नि तोहि त्यांच्याबरोबर निघाला.

'ज्याला ज्याला त्या मुलाचा प्रकार समजला त्या प्रत्येकाच्या मनात देवीबद्दलचा संताप उसळून आला. होतां होतां पंधरा वीस तरुण हातांत काठ्या, खुंट, लाकूड काय मिळेल तें घेऊन देवळाकडे धांवून आले.

'पण देवळांत जाऊन पहातात तों काय, देवी अन् देव केव्हांच अंतर्धान पावले होते.

'त्या तरुणांची पूर्ण निराशा झाली, त्यांच्या अंतरांत उफाळलेला क्रोध निष्फळ ठरला! त्यांनीं आजूबाजूला पाहिलं. पण कुठेंहि त्यांचा तपास लागला नाहीं.

'देवळांत काय होतं–!

'गांवकऱ्यांच्या अंधश्रद्धेची निशाणी–देवभोळेपणाची पताका तो घट!

'त्या क्रोधाविष्ट तरुणांचे ताडताड् सोटे पडले त्याच्यावर!

'देवळांत जिकडे तिकडे पाणीच पाणी झालं अन् त्या भग्न घटाच्या पैपै एवढ्या ठिकऱ्या त्या पाण्यांत मिसळल्या.'

ही हकीगत ऐकतांना उत्कंठेच्या शिगेवर पोंचलेला शरद् एवढा वेळ कोंडलेला निःश्वास टाकीत म्हणाला.

–काय भयंकर जोडपं आहेरे हें!

—तीं दोघं नवराबायको आहेत असं वाटलं का तुला? छे रे छे: ! निसर्गाच्या—वासनेच्या रज्जूनं आकृष्ट झालेलीं एकत्र बांधलेलीं अशीं तीं दोघं एकमेकांचीं कोणीतरी आहेत.—मी म्हटलं.

बोलतां बोलतां किती वेळ गेला तें समजलं नाहीं. आम्हीं बसल्या जागेवरून उठलों तेव्हां आरक्त सूर्यबिंब पश्चिमेकडे पर्वतराजीच्या शिखरावरून खालीं ढळत होतं.

—शरद्, चल झप् झप् आतां. थोडा उशीर झाला तर आमचा गडी कंदील घेऊन शोधायला येईल आपल्याला.

# काटशह

चिकणवाडी

ता. १६ नोव्हबर १९३६

प्रियमित्र इंदुकांत,

आज तुला पत्र लिहितांना माझ्या हातांतील लेखणी सारखी फुरफुरत आहे. शिवाजी महाराजांची घोडी महाराज तिच्यावर स्वार होतांच हर्षातिशयानें जशी फुर्र फुर्र करीत असे तशी ! आणि माझें मन स्थलकालाच्या मर्यादा ओलांडून कुठल्यातरी रम्यशा गंधर्वनगरींत भराऱ्या मारीत आहे. मला वेडबिड लागलें असेल कीं काय या कल्पनेनें तुला घाबरण्याचें मुळींच कारण नाहीं. आजच्या माझ्या आनंदमय मनःस्थितीचें कारण माझें आश्रमांतर हें होय. आज मी खराखुरा गृहस्थाश्रमी बनलों. चार दिवसांपूर्वींच माझ्या नवोढा गृहिणीचें इथें आगमन होऊन तिनें माझ्यासकट बिऱ्हाडाचें स्वामित्व

आपल्याकडे घेतलें आहे. चार दिवसांपूर्वींची ती माझ्या घराची अवकळा अन् आजचं त्याचं स्वच्छ नी सोज्वळ स्वरूप यांतलं अंतर स्वर्ग–नरक या द्वंद्वाच्या उपमेनंच व्यक्त करावं लागेल. बिऱ्हाडाची झाडसारव करून साऱ्या वस्तु व्यवस्थितपणें मांडून सगळें ठाकठीक करायला तब्बल दोन दिवस लागले तिला. अन् तें करीत असतांना माझ्या अव्यवस्थेबद्दल नी गबाळपणाबद्दल तिनं हलक्या हातानं मला शालजोडींतलेहि द्यायला कमी केलं नाहीं. या मिषानं माझ्यांतल नवरेपणाचा सैतान कितपत सुप्त किंवा जागृत आहे तें अजमावून पाहिलं असावं तिनं ! पण तिच्या तोंडून प्रथमच निघालेले ते लटक्या रागाचे शब्द नी ते ईषद्दुष्ट कटाक्ष अंगावर झेलतांना, उन्हाळ्यांत एकाद्या शिलाखंडावरून खालीं पडणाऱ्या झऱ्याचे शीत तुषार अंगावर घ्यावे तसा आनंद होत होता मला. द्वारकेच्या राजप्रासादांत झोपी गेलेल्या अनिरुद्धाला चित्ररेखेनं मंचकासह उचलून आकाशमार्गें उषेच्य महालांत नेलं त्यावेळेला तो जसा विस्मयस्तिमित झाला असेल तशीच कांहीं अंशीं माझी स्थिति झाली आहे. एका नव्याच जगांत आल्यासारखं वाटतं मला.

चार दिवसांपूर्वीं ज्या टेबलावर सिगारेटचीं थोटकं, भजींचिवड्याचे कागद, वगैरे वस्तु गट्टीनं विहार करीत होत्या तेंच टेबल या वेळीं धुतल्यासारखं स्वच्छ आहे व त्याच्यावर एका लहानशा पुष्पपात्रांत एक सपर्ण गुलाब खिडकींतून येणाऱ्या वायुलहरींनीं डोलत आहे व सभोंवतीं सौम्य सुगंध पसरीत आहे.

सौ०च्या या पतिपूजेनं भोळ्या सांबासारखा मी खूष झालों अन् ती दरवाज्यांत डोकावली तेव्हां तिला म्हटलं,

— गुलाब, टेबलावर ठेवलास तो माळलास कां नाहींस ?

ती गोडसं हसली नी तिनें आपल्या मानेला नाजूकसा विळखा देऊन माझ्याकडे अर्धवटशी पाठ फिरवली. तों काय, तिच्याहि आंबाड्यांत होताच की तसलाच एक गेंदबाज गुलाब !

— हं समजलो. स्वार्थ साधून झाल्यावर मग परमार्थ सुचलेला दिसतोय हा — मी मुद्दाम तिला डिवचलं.

— उपकाराची फेड वाटतं ही !— असें म्हणताना तिनें जी मान हालवली त्यांत 'बरं आहे; पाहून घेईन' असाच कांहीं तरी अर्थ असावा.

तिला मनमोकळं हसता येत असेल अशी पूर्वी मला कल्पनाहि नव्हती. पण इथं आल्यापासून ती इतकी हंसते कीं एखादं हास्यप्रतिबंधक औषध हुडकावं लागेल कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे मला. हास्याचा स्वतःच्या शरीरप्रकृतीवर चांगला परिणाम होतो असं शास्त्रज्ञांचं मत आहे. मी आज एक नवीनच शोध लावला आहे. हास्याचा परिणाम दुसऱ्याच्या प्रकृतीवरहि चांगला होतो. आज चार दिवस मला इतका उत्साह अन् तजेला वाटतो कीं कांहीं विचारूं नकोस. स्त्री ही पुरुषाची प्रेरकशक्ति आहे असं जे म्हणतात तें खरें आहे अगदीं !

इतके दिवस माझ्या संसाराचीं कल्पनेच्या फलकावर जीं चित्रं मी रंगवीत होतों तीं आतां सत्यसृष्टींत उतरण्याच्या मार्गाला लागलीं आहेत. विशेषतः मुख्य अन् व्यावहारिक लाभ सुग्रास जेवणाचा. त्या रंगूबाईच्या खानावळीला विटलों होतों मी अगदीं. अन् घरीं असलों तरी काय ? तेंच ! वडिलांचा धंदा खानावळीचा असल्यामुळें आम्हीहि एक

खानावळीचे मेंबरच. अर्थात् सौ० इथं असल्यामुळं आतां सारं ठाकठीक जमेल. थोडक्याच काळात सुदामदेवाचा बळीम होईन म्हणतों.

आता तूं तुझ्या एजन्सीच्या कामासाठीं केव्हाहि इकडे आलास तरी तुला चहा पाजण्यासाठीं मला विश्रांतिगृहाची पायरी चढावी लागणार नाहीं. चहा नी त्याच्यासोबत गरम, खुसखुशीत असं कांहींतरी 'च्याव् म्यांव्' तुला घरींच मिळेल. गृहिणीच्या पाकशास्त्रप्राविण्याची ही जाहिरात मी करीत आहे असं समजूं नको.

माझ्या आकांक्षेप्रमाणं तिला ज्या ज्या गोष्टी यायला पाहिजेत त्या सगळ्या अजून येत नाहींत. हळू हळू शिकवीन म्हणतों. असो ! पत्र फार लांबलं. उगाच तुझ्या सहनशक्तीला अधिक ताणणं हेंहि चांगलें नव्हे. पत्रोत्तर पाठवून तुझ्या घरचा क्षेमसमाचार कळव.

तुझा

प्रभाकर.

२

श्री. पणजी

ता. २५-१२-३६

चि. प्रभाकर यास अनेक आशीर्वाद उपरि

पत्र लिहिणेस कारण तूर्त खानावळींत मेंबर वाढले आहेत. सध्यां नाताळची सुट्टी असल्यामुळं गोवा पाहाण्यासाठीं येणाऱ्या पुण्या मुंबई-कडील पाहुण्यांची घरांत गर्दी झाली आहे. आणखीहि बरेच लोक

उद्यांपरवांपर्यंत येतील असा अंदाज आहे. तरी सौ. सूनबाईला ताबडतोब पाठवून दे. स्वैंपाकाच्या बाईनें कालच चार दिवसांचं प्रस्थान काढलं आहे. तुझ्या आईच्या हातून आतां विशेषसं काम होत नाहीं हें तुला ठाऊक आहे. आलेल्या पाहुण्यांची त्यांच्या इच्छेप्रमाणं बडदास्त राखली तरच चार पैसे आपल्याला मिळणार आहेत. सूनबाई आली कीं ती घरांतलं बरंचसं काम करील. शिवाय चि. गणू, यमुना हीं आहेतच तिच्या मदतीला. हा एवढा मोसम संपला कीं, चाललंच आहे मग आपलं कसं तरी. नित्याच्या कामाचा एवढासा बाऊ नसतो. पण नैमित्तिक येणाऱ्या लोकांचाच मोठा त्रास असतो. त्यांतून प्रत्ये-काच्या वेगवेगळ्या तऱ्हा. जीव नुसता शिजून जातो अगदीं. पण करणार काय? धंदा सांभाळला पाहिजेना! असो! सौ. सूनबाईची वाट पहात आहें तुझ्या ऑफिसला सुट्टी असल्यास तूंच तिला घेऊन घरीं निघून ये. नसल्यास तिला तरी पाठव नी तूं कांहीं दिवस रंगू-मावशीच्या खानावळींत पूर्वीप्रमाणंच जेवायला जात जा. प्रकृतीला संभाळून रहा. बाकी सर्व ठीक. कळवें हे आशीर्वाद.

तुझा
नाना.

३

श्री. चिकणवाडी
ता. १०-१-३७

प्रिय मालती!

अजून तुझा नाताळ नी तुमचे ते पाहुणे खलास झाले नाहीं का?

आज जानेवारीची दहा तारीख उजाडली, म्हटलं लक्षांत आहे का बाईसाहेबांच्या ! बाकी तुझ्या कशाला तें लक्षांत येईल म्हणा. तारखा मोजीत बसलों आहे मी इकडे ! आज येशील, उद्यां येशील, अशा आशेच्या दोराला लोंबकळत कटींत दगड घालीत दिवसामागून रात्र नी रात्रीमागून दिवस कंठीत बसलें आहें. पण राणीसाहेबांचा इकडे उदय होण्याचें चिन्ह कांहीं दिसत नाहीं लवकर. चांगली आहे नवऱ्याची काळजी तुला म्हणायची ! तुम्ही हरतालकेचा उपवास नी वटसावित्रीची पूजा करतांना मारे सतीचा अवतार आणून मिरवतां तेवढा पाहून घ्यावा. पण अंतरांत प्रेम नी माया यांच्या नांवानें भोपळ्याएवढें पूज्य !

उपकार कर नी आतां तरी लवकर निघून ये. यायचं नसलं तर निदान तसं तरी कळव हो, म्हणजे मी निरर्थक आशेच्या लपंडावांत तरी सांपडणार नाहीं ! 'नैराश्यं परमं सुखम्' नाहीं का ? तुझ्या आगमनाची नसली तरी निदान पत्रोत्तराची वाट पाहूं का ? होईल का या दीन दासावर देवतेची एवढी तरी कृपा ! तुला ईश्वर बुद्धि देईल तसें कर.

तुझा

प्रभाकर

४

श्री. पणजी

ता. १५-१-३७

चरणांचे सेवेसी कृ. सा. न. वि. वि.

आपलें पत्र येथील आपल्या एका स्नेह्याकडे, तिभून मावसबहिणी-

कडे अन् तिथून माझ्याकडे असे टप्पे घेत काल मला मिळालें. किती कुचकट नी बोंचक पत्र लिहिलें आहे तें आपण? मर्मभेदक शब्दांच्या सुया टोंचून बायकांच्या डोळ्यातून पाणी काढणं हें पुरुषांना भूषण वाटतं कां? ते पत्र वाचून माझ्या मनाला काय वाटलं तें मी कशाला सांगूं? कां एवढी रागाची आग पाखडलीत माझ्या अंगावर? माझी परिस्थिति थोडी जरी आपण जाणून घेतली असतीत तर असले आंतडीं कुरतडणारे शब्द आपल्या लेखणींतून निघाले नसते. मी तिकडे लवकर आलें नाहीं म्हणून आपण माझ्यावर क्रुद्ध झाला आहां. पण मनाला वाटेल तेव्हां वाटेल तिकडे जायला मी इतकी अजून स्वतंत्र झालें नाहीं. आपण पाठवलीत, इकडे आलें. ती. मामंजी पाठवतील किंवा आपण येऊन घेऊन जाल तेव्हां तिकडे येईन. मला तिकडे येऊं नयेसं कां वाटतं? माझं शरीर इथं घरांत वावरतं; पण मन सारखं आपणाकडे अनिवार ओढ घेत आहे! अशोकवनांतल्या सीते-प्रमाणं किंवा मेघदूतांतल्या यक्षपत्नीप्रमाणं मी झुरणीस लागलें नाहीं नी पांढरी फटफटीत अन् कृशहि झालें नाहीं. चांगली खातें, जेवतें, कामधाम करतें नी धडधाकट आहें! पण मनाला मात्र सदैव वाटत असतं कीं कधीं जायला मिळेल आपणाला? खरं वाटेल कां माझं हें लिहिणं आपल्याला? स्त्रीहृदयांतील नाजूक नी हळुवार भावना पुरु-षांच्या राकट बुद्धीला कशा उमगणार?

कालच रात्रीं ती. मामंजी चुलीशीं शेकत बसले होते तेव्हां मोघम शब्दांत मी तिकडे येण्याची गोष्ट काढली. काय खवळले त्यावेळीं माझ्यावर! आषाढ महिन्यांतला तुफानी समुद्र तरी बरा! मांत्रिकानं

मंतरलेलं पाणी मारतांच भुतं जशीं थैमान घालतात तसा प्रकार सुरू केला त्यांनीं. चढत्या सुरात त्यांनीं त्या वेळीं तीक्ष्ण शब्दांचा मारा माझ्यावर केला तो काहीं विचारूं नका. "...तुम्ही हल्लींच्या पोरी! तुम्हांला कुटुंबांत रहायला नको. घरप्रपंच चालवायला नको. नवऱ्याला घेऊन वेगळं रहायला नी हव्या तशा टिवल्या बावल्या करायला हव्यात तुम्हाला, नाहीं का?...अवदसे! माझ्या घरात फूट पाडायचा विचार दिसतो आहे तुझा...नवऱ्याला धड पंचवीस रुपड्या पगार मिळत नाहीं नी लागली मामलेदारणीची पेट मिरवायला! मी मुळींच चालूं देणार नाहीं असले थेर...ही खानावळ कोण चालवणार तुझा बाप... इ. इ." काय तोंडाला येईल तें सुसंगत विसंगत बोलले ते मला. माझं सोडाच; पण त्यावेळच्या वाक्गंगेत माझ्या बेचाळीस पिढ्यातले पूर्वजहि उद्धरून गेल्यावाचून राहिले नाहींत!

एकूण मृदंगाला दोन्ही बाजूंनीं मार म्हणतात तो असा! मला तिकडे पाठवण्याचा विचार दिसत नाहीं त्याचा. चार दिवसांपूर्वींच काहीं तरी कुरापत काढून घरातल्या स्वैपाकाच्या बाईला त्यानीं घालवून दिली. तूर्त चूल माझ्याच ताब्यांत आलेली आहे. याउपर आपणच काय तो विचार ठरवावा.

आतां तरी माझ्यावरचा राग जाईल ना? या पत्राच्या आरंभीं मी चिडखोरपणें जे शब्द लिहिले ते लिहायला नको होते असं आतां मला वाटूं लागलं आहे. आपल्या पत्रात व्यक्त झालेला राग खराखुरा माझ्यावर नव्हताच मुळीं; एवढें सुद्धा मला वेडीला कळले नाहीं! नाहींतरी

माझ्यावर प्रेम करण्याचा नी तसाच रागावण्याचाहि हक्कच आहे आपल्याला, नाहीं का? क्षमा कराल ना आपण मला त्याबद्दल?

प्रकृतीला संभाळून असावं. जिवाचे हाल करून घेऊं नयेत! शप्पथ आहे माझ्या गळ्याची!

आपलीच
सौ. मालती

५

श्री. पणजीं

ता. २५-१-३७

चि. प्रभाकर यास अनेक आशीर्वाद.

तुझा सौ. सूनबाईला पाठवून देण्याबद्दलचा निरोप पोंचला. पण तूर्त घरांत फार अडचण असल्यामुळं तिला पाठवतां येत नाहीं. आणि बराच विचार केल्याअंतीं मला असं वाटूं लागलं आहे कीं दोन बिऱ्हाडांचा खर्च आपल्याला झेपणार नाहीं. तुला तरी तिथं बिऱ्हाड करून काय करायचं आहे? उगीच नसता व्याप मात्र. शनिवार रविवारच्या सुट्टींत येत जा म्हणजे झालं. शिवाय आणखीहि अधून मधून तुला सुट्या असतातच. खानावळीचा हा धंदा असा आहे कीं, याला भरपूर मनुष्यबळ पाहिजे. बाहेरच्या उपऱ्या माणसांपेक्षां घरचीं माणसं मदतीला असतील तर धंदा चांगल्या प्रकारें करतां येतो हें तुला ठाऊक आहेच. घरांतल्या सुनांना स्वतंत्रपणें रहाण्यावागण्याची

एकदां संवय लागली कीं मग त्यांना घरची माया रहात नाहीं. सासू-सासऱ्यांना नी वडीलधाऱ्या माणसांनाहि मग त्या जुमानीत नाहींशा होतात. म्हणून मुळापासूनच आपण त्यांना तशी सुट्टक देतां कामा नये. करिता तिकडे स्वतंत्र बिऱ्हाड करण्याचा विचार तूं मनांतून काढून टाक. प्रकृतीला जपून वाग. अळवाच्या माड्या तिथें स्वस्तशा मिळाल्या तर पन्नास पाठवून दे. इथं फार महाग पडतात. पगाराच्या पैशांतून जरुरीपुरते पैसे जवळ ठेवून बाकीचे नियमितपणें माझ्याकडे पाठवीत जा. उगीच अवाच्यासव्वा खर्च करूं नको. बाकी अधिकोत्तर भेटींत बोलूं. कळावें हे आशीर्वाद.

तुझा

नाना

ता. क. सौ. सूनबाईचीं लुगडीं फाटलीं आहेत असं ती म्हणते. तरी पगार होतांच ताबडतोब १० रु. पाठवून दे. बरोबर तुझ्या सौ. आईलाहि एखादं लुगडं घेऊन दिलंच पाहिजे. तरी सवड असल्यास ५ रु. जास्त पाठव. क.

नाना.

६

श्री. चिकणवाडी

ता. २–२–३७

प्रियमित्र इंदुकांत !

गेल्या नोव्हेंबरमध्यें मी पाठवलेल्या पत्रांत जो मजकूर मोठ्या

हर्षनिर्भर अंतःकरणानं लिहिला होता त्याच्या उलट मजकूर तितक्याच विषादपूर्ण लेखणीनं आज तुला लिहिण्याचा प्रसंग येईल अशी त्यावेळीं मला कल्पनाहि नव्हती. फार दिवसांचा क्षुधित मनुष्य पाणी सुटल्या जिभेनं पंचपक्वान्नांच्या पानावर बसावा अन् पहिला वहिला घास त्याच्या घशांत उतरतो न उतरतो तोंच कोणीं तरी फाडकन् श्रीमुखांत वाजवून त्याला तिथून उठवावं म्हणजे त्याची जशी केविलवाणी मुद्रा होईल, तशी माझी स्थिति झाली आहे. मीहि आज असाच भरल्या पानावरून दूर लोटला गेलों आहें अन् विशेष दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, माझ्यापुढं संसाराचं भरलं ताट प्रत्यक्ष माझ्या परमपूज्य तीर्थरुपानीं दूर ओढून नेलं आहे. या अलंकारिक भाषेनं गोंधळून जाऊं नको. झाल्या प्रकाराचा सरळ सरळ उलगडा करतों मी तुझ्याकडे !

गेल्या नाताळाच्या दिवसांत खानावळींत पाहुण्यांची गर्दी झाली आहे म्हणून अडचणीसाठीं सौ. ला घरीं पाठवण्याबद्दल ती. नानांनीं मला कळवलं. मी लगेच तिला पाठवून दिली. पण त्यानंतर अद्यापि ती इकडे येऊं शकली नाहीं. दोन दिवसांपूर्वीच नानांचं पत्र आलं; त्यांत ते लिहितात कीं, 'सूनबाईला मी तिकडे पाठवित नाहीं. उगीच दोन बिऱ्हाडांचा खर्च नको. शिवाय घरांतहि अडचण आहेच. तूंच सुट्टींत घरीं येत जा. इ. इ.'

फिरून आम्ही एकटे ते एकटेच ! 'कुठेंहि गेला तरी पळसाला पानें तीनच' म्हणतात ना, तशांतली आमची स्थिति होणार कीं काय हरि जाणे !

मी घरीं जाऊन पांच मिनिटांच्या आंत तिला घेऊन येऊं शकेन. पण—

अन् हा पणच महाभयंकर आहे. आमचे वडील म्हणजे कलि-युगांतले जमदग्नीचे अवतार आहेत नुसते! भडकले कीं, चैत्र-वैशाखांतला वणवा. समजा, मी घरीं गेलों अन् तिला घेऊन इकडे यायला निघालों तर छाती पिटीत, शेंडी पिस्कारित माझ्या आधीं ते घराबाहेर पडतील. अन् रस्त्यावर उभे राहून तार सप्तकांत अद्वातद्वा बोलून तिथल्यातिथं माझं श्राद्ध, पिंडदान वगैरे एकदम उरकून टाकतील. मधून मधून डोकें आपटून घ्यायलाहि कमी करणार नाहींत. त्यांच्या मनाविरुद्ध एवढीशी जरी गोष्ट झाली तरी त्यांच्या हृदयांतला सैतान एकदम विश्वरुप धारण करतो. असे प्रसंग आजवर पुष्कळदां घडले आहेत.

त्यांनीं असं रस्त्यावर उभं राहून तोंडाला येतील ते अपशब्द नी शिव्याशाप उच्चारायचे, मला तें सहन न होऊन मीहि कांहींतरी उलट बोलून त्यांच्या क्रोधानलांत राकेलचा डबा ओतायचा, बाहेरच्या लोकांनीं हें राणा भीमदेव नाटक फुकटांत पहायचं नी टाळ्या पिटायच्या, घरांतल्या माणसांनीं रडून आक्रोश करायचा अन् एवढं हें सगळं होमकुंड पेटवून मी सौ. सह घरांतून निघायचं हा प्रकार मला पसंत नाहीं.

सौ. ला तर इकडे आणायचीच; पण ती अगदीं निमूटपणें ताशे-ढोल न वाजतां अन् फटाके भुईनळे न उडतां आणायची असा माझा विचार आहे. आज चार दिवस त्यासाठीं कोणती युक्ति योजावी या विचारांत मी रात्रंदिवस आहें. खूप डोकं खाजवलं पण उपाय सुचत नाहीं. मनाला अगदीं बेचैन झालं आहे. तुझ्या सुपीक टाळक्यांतून

एखादं युक्तीचं पिल्लं बाहेर पडल्यास तें इकडे पाठवून दे. फार आभारी होईन तुझा !

तूर्त तरी एकाकी दिवस कंठीत आहें ! कोणत्याहि सुखाचं असंच आहे. सुखकारक वस्तु जोंवर हाताला आलीच नाहीं तोंवर तिच्याबद्दल आशा, हुरहुर असली तरी तिच्यांत दाहकता नसते; पण सुखविषय हातीं आला, त्याची खुमारी काय ती कळली, अन् मग जर तो एकाएकी अंतराळांत अदृश्य झाला तर ते दुःख मग मर्मनिकृंतक होते. जीव नुसता सैरावैरा होतो त्यामुळं ! माझी गत आज तशी झाली आहे. असो ! आपलं दुःख जिव्हाळ्याच्या मित्राजवळ ओकून टाकलं कीं त्याची जळजळ थोडी तरी सुसह्य होते. असं जरी असलं तरी माझी ही रडकी कर्मकथा अधिक लांबवून तुला निष्कारण त्रास देत नाहीं.

माझं सुखनिदान आज तरी हरवलं आहे. पुन्हां जेव्हां केव्हां तें मला गवसेल तो सुदिन म्हणायचा ! क. लो. त्रि.

तुझा तूर्त तरी हतभागी मित्र
प्रभाकर.

७

श्री. सांखळी
ता. ४-२-३७

मित्राचे सेवेसी—

तुझं पत्र आतांच मिळालं. तुझी परिस्थिति समजून मनाला वाईट वाटलं. पण गड्या, डरना मत् ! हेहि दिवस जातील. मी आणखी

चार दिवसांनीं तिकडे येणार आहें. त्या वेळीं आपण दोघे मिळून शांत मनानं याचा विचार करूं. म्हणून तूर्त पत्रांत अधिक आगळं कांहीं लिहीत नाहीं. क. लो. वि.

तुझा मित्र
इंदुकांत

८

श्री. चिकणवाडी
ता. २०–२–३७

ती. वडिलांचे सेवेसी प्रभाकर याचा शिरसाष्टांग नमस्कार वि. वि.

आज एका विशिष्ट हेतुनं पुढं मागं घोटाळे होऊं नयेत यासाठीं हें पत्र लिहीत आहें. आपण सौ. स तिकडेच ठेवून घेऊन दोन बिऱ्हाडापायीं निष्कारण होणारा खर्च वांचविलांत यात आपली अनुभवी दूरदृष्टिच दिसून आली आणि इकडील बिऱ्हाडाचा खर्च वांचून वर एक स्वैंपाकीणबाई फुकटांत खानावळींत राबायला मिळाली हा तर मोठा लाभच झाला आपणाला. मीहि ह्या आपल्या विचाराशीं सहमत आहें. धंदा चालवायचा म्हणजे अशीं संधानें राखलींच पाहिजेत. सौ. ला इकडे आणून चालत्या धंद्याला खीळ घालायची नाहीं अन् घरांत फूट पाडायची नाहीं असंच मीहि मनाशीं ठाम ठरवून टाकलं आहे. त्यामुळं इकडे माझी थोडीशी गैरसोय होणार होती पण मी नुकतीच माझी सोय जमवून घेतली आहे. कस्तुर ही वेश्येची मुलगी असली तरी ती फार गुणी आहे. रुपानं तर सौ. पेक्षां किती सरस!

तीच सध्यां माझ्या इथल्या बिऱ्हाडाची सर्व व्यवस्था पहाते. एवढ्यांत आपणाला काय तें समजेल. यापेक्षां या बाबतींत अधिक लिहिणं म्हणजे तें पुत्रधर्माला अनुचित होईल.

तरी या पत्राच्या द्वारें आपणास एवढीच आग्रहाची विनंति कीं, आपल्या मनांत कधींकाळीं जरी आलं तरी सौ. स इकडे पाठवण्याच्या भानगडींत आपण चुकूनसुद्धां पडूं नये! कारण एका म्यान्यांत दोन सुऱ्या कधींच राहूं शकत नाहींत, हें आपण जाणतांच आहां!

माझा इथला खर्च भागून उरतील ते पैसे मी नियमितपणें आपणाकडे पाठवीत जाईन. तूर्त तरी माझी घरीं येण्याची आपण वाट पाहूं नये. माझ्या हातून घडत असलेली ही गोष्ट चुकीची आहे असं जरी आपणास वाटत असलं तरी पुत्राचे कसलेहि अपराध पिता हा आपल्या पोटांत घालूं शकतो हें मला माहीत आहे.

ती. सौ. आईस साष्टांग नमस्कार. लहानांस आशिर्वाद. अधिक उण्या शब्दाबद्दल क्षमा असावी. कळावें, सेवेसी श्रुत होय.

आपला नम्र

प्रभाकर

१

पणजी

श्री. ता. २२-२-३७

अनेक आशीर्वाद!

प्रभ्या, चार दिवस तुझ्या बायकोला इकडे ठेवून घेतली; त्यामुळें तुझी इथवर मजल जाईल अशी मला बिलकुल कल्पना नव्हती.

असलीं घाणेरडीं कृत्यं करायला अन् वर टेंभा मिरवीत बापाला पत्र लिहायला लाज नाहीं वाटली तुला ! बापाच्या तोंडाला डांबर फासायचा विचार आहे कीं काय तुझा ? जगाला ही गोष्ट समजली तर चार लोकांत तोंड दाखवायला मला जागा रहाणार नाहीं. कुळाच्या कीर्तीला कलंक लावणारा चांगला दिवटा सुपुत्र जन्मलास बाबा ! तें कांहीं नाहीं. जर तुला तुझ्या बापाची कांहींतरी किंमत असेल तर लोकांत या गोष्टीचा अधिक बभ्रा झाला नाहीं तोंच ती कोण अवदसा घरांत आणली आहेस त्या ××× ला घरांतून आत्तांच्या आत्तां घालवून दे. लग्न करून सोन्यासारखी बायको तुला आणली अन् तूं असा बाहेर शेण खायला लागलास. जग थुंकेल तुझ्या नी माझ्या तोंडावर !

तुझ्या आईला ही गोष्ट कळली तर ती अन्नपाणी वर्ज्य करून हाय घेऊन बसेल. अजून मी ही गोष्ट घरांत कोणालाच कळवली नाहीं. उद्यां सकाळीं चि. गणूला बरोबर देऊन सौ. सूनबाईला तिकडे पाठवून देत आहें. तिच्यासह सुखानं संसार कर ! आणि जर कां यापुढं तुझे असले चाळे माझ्या कानावर आले अन् जर त्या बयेला घरांतून हाकलून बायकोला चांगल्या प्रकारें नादवून घेतली नाहींस तर इतःपर तुझें तोंड पहाणार नाहीं मी हें पक्कें लक्षांत ठेव ! कळावें हे आशिर्वाद.

तुझा
नाना

---

# उर्मिला

(सुविख्यात साहित्यिक श्री. वि. स. खाडेकर यानी गोमंतकांत भरलेल्या प्रांतिक साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना उर्मिलेची एक सुंदर उपमा दिली. ही उपमा जितकी चित्तवेधक तितकीच मराठी वाङ्मयात अभिनव अशी होती. गोमंतकातील उपेक्षित साहित्याला उद्देशून त्यानी ती उपयोजिली होती. ती उपमा ऐकताच त्यक्त, उपेक्षित, भग्न–मनोरथ अशी उर्मिलेची नितान्त–करुण मूर्ति माझ्या अन्तःश्चक्षूंसमोर उभी राहिली. कल्पनेच्या उभ्या आडव्या रेषा ओढून तिचे हें रेखाचित्र काढण्याचा प्रयत्न केला आहे.)

उद्यां रामचंद्राच्या राज्याभिषेकाचा मुहूर्त ठरला होता. दुसऱ्या दिवशीं सूर्य पूर्वक्षितिजाच्या सोनेरी सिंहासनावर आरूढ होण्याच्या वेळेलाच रामचंद्र रत्नजडित राजसिंहासनावर प्रतिष्ठित होणार होता.

अयोध्यावासी प्रजा आनंदसागराच्या उर्मींवर तरंगत होती. रात्रीं झोपेंतसुद्धां भावी रामराज्याचीं सुखस्वप्नें पडत होतीं त्यांना.

पण स्वप्नाचा उलटा अनुभवच जास्त येतो व्यवहारांत! स्वप्नांत एखाद्याचें लग्न पाहिलें तर दुसऱ्या दिवशीं बहुधा कोणाच्या तरी प्रेतयात्रेचंच बोलावण येतं.

सकाळीं प्रजाजन राजवाड्यात जातात तों त्यांना भूकंपाचा धक्का बसतो तसं झालं.

— युवराज चौदा वर्षं वनवासाला निघाले.— कोणीतरी म्हणाले.

— कां?— प्रजेने एकच गर्जना केली.

— महाराजानी कैकेयीला दिलेल्या वराच्या पूर्तीसाठीं.— दुसऱ्या कोणी तरी उत्तर दिले.

राजपरिवारात कहर उसळला होता. प्रत्येकाच्या डोळ्यातून अश्रु नी तोंडातून धिक्कार बाहेर पडत होते. सूर्य उगवला होता, पण त्यानें मेघाचे पांघरूण डोळ्यावर ओढून घेतले होतें. राज्याभिषेकासाठीं जमा केलेल्या सामग्रीला अवकळा आली होती.

राजवाड्याच्या विस्तीर्ण प्रांगणात उभे राहून लोक गर्जना करीत होते. 'नाहीं! आम्ही युवराजाना वनवासाला जाऊं देणार नाही!!'

बाहेर मेघगर्जना होत होती, नी आंत पाऊस पडत होता. अन् त्यांतच कैकेयीची वीजहि कडाडत होती.

राम वनवासाची सिद्धता करीत होता. सीतेनेंहि रामचंद्राचें मन वळवून त्याच्याबरोबर वनवासी होण्याची अनुज्ञा मिळविली होती. दशरथानें त्याला विचारलें, —रामभद्र! त्या सुकुमार बालिकेलाहि तूं वनांत घेऊन जाणार?

'त्वया सह निवत्स्यामि वनेषु मधुगंधिषु, इति वा रमते हासौ स्नेहस्तस्याः स तादृशः' हें भवभूतीनें उद्‌धृत केलेलें वचन उत्तरादाखल दशरथाला सांगून राम मोकळा झाला.

जिथें राम–सीता तिथें त्यांच्या पाठीमागून 'सुई मागून दोरा' म्हणतात ना, तसा लक्ष्मण हा जायचाच ! बंधु, मित्र अन् सेवक या तीन नात्यांनी तो रामचंद्राशीं निगडित झाला होता. रामाचा तो बंधु होता. राम त्याला आपला सुहृद् मानीत असे. अन् लक्ष्मण स्वतःला रामसेवक समजत होता.

सीतादेवी वल्कलें नी मृगाजिनें हातांत घेऊन राणीवशांत इकडून तिकडे हिंडत होती. मध्येंच ती तीं अंगावर लपेटून बरोबर बसतात कीं नाहीं तें अजमावून पाही. गाढ अंधारांत शुक्राच्या चांदणीला एकप्रकारचें विशेषच आल्हादकत्व नीं चमक उत्पन्न होते, तशीच त्या निराशामय विषण्ण वातावरणांत सीतेची मुद्रा कसल्यातरी मधुर भावलहरींनी चकाकत होती. वनवासांतल्या कष्टमय जीवनाचा तिला अनुभव नव्हताच, पण कल्पनाहि नव्हती.

तिच्या आवृत तृषित आणि संकोचलेल्या यौवनसुलभ मनोवृत्ति तिला कानांत सांगत, 'सीते, जा तूं वनवासाला. तिथेंच तुला प्रियसमागम अखंड घडेल !'

सीतादेवीची ही वनप्रस्थानाची धांदल पाहून उर्मिलेचा जीव थोडा थोडा होत होता. तिला वाटे, देवीची तर मारे गडबड चालली आहे, पण मला अजून कोणीच कसें सांगत नाहीं तयारी करायला ? कोणाला

विचारूं ? महाराजांना ? छे: ! त्यांना कसं आपण विचारायचं? कुल-स्त्रीनं मर्यादातिक्रम करणं योग्य नव्हे !

मग महाराणींना विचारलं तर? नको रे देवा. काय सांगतील त्या ? आधींच त्या माउलीचं पुत्रविरहाच्या वेदनेनें करुणाक्रंदन चालू आहे. त्यांत मी जर काहीं तरी विचारलं, तर एक हुंदका अधिकच फुटेल त्यांना !

मग—?

तिने ठरवले कीं हें काम तिकडच्याशिवाय होणार नाहीं. सीता-देवीनें कसे डिकाला तेल लावतात तसें बेमालूम काम केलें ते तिला ठाऊक होतें.

लक्ष्मण कांहींशा गंभीर मुद्रेनें आंतबाहेर हेलपाटे घालीत होता, तें उर्मिलेला दिसत होतें. ती आशाळभूत दृष्टीनें अन् धडधडत्या हृदयाने त्याच्या भेटीची संधी पहात होती.

पण प्रश्न एवढाच होता कीं रामकार्यांत निमग्न असलेला लक्ष्मण उर्मिलेच्या वाट्याला यावा कसा ?

कारण रामचंद्राची सारी आवराआवर नी निरवानिरव करण्याचें कार्य त्याच्याच शिरावर होतें.

कुठलें तरी दूर दूर अंतराळांत असलेले ध्येयाचें सूर्यबिंब कवळण्या-साठीं उड्डाण करतांना बहुतेकांची पहिली लाथ कोणावर बसत असेल तर ती घरातल्या माणसाच्या हृदयावर !

जगाची–देशाची–देवाची हाक त्यांना ऐकूं जाते. पण प्रिय जनाच्या हृदयाचें आक्रंदन मात्र त्यांच्या कर्णपथावर आदळत नाहीं.

बाहेर रामवियोगाच्या दुःखानें टाहो फोडणाऱ्या जनसंमर्दाचें सांत्वन करण्यासाठीं आपण त्यांना चार गोड शब्द सांगावे असे त्याला वाटलें. पण आंत पतिविरहाच्या आगीनें होरपळणाऱ्या एका हृदयावर सहानुभूतीच्या जलाचे दोन तुषार टाकावे अशी जाणीवहि त्याला झाली नाहीं.

× × ×

थोड्या वेळानें तो उर्मिलेच्या महालात आला. तोसुद्धां पत्नीचा निरोप घेण्यासाठीं नव्हे; तर त्याचें खड्ग तियें होतें तें नेण्यासाठीं !

पत्नीच्या अश्रुपूर्ण निरोपापेक्षां तलवारीचीच पुढच्या वनवासांत त्याला जास्त जरूर होती. तीच त्याला अधिक सुख देऊं शकली असती.

– आर्यपुत्र !– उर्मिलेने हाक मारली.

–देवी ! आहेस का तूं इथं ? मी तुलाच आतां हाक मारणार होतों. हं ठीक ! मी आतां निघालो बरं का. आता चौदा वर्षांनी भेट ! आणि हो, महाराजाच्या अन् मातुःश्रींच्या सांत्वनाची नी त्यांच्या प्रकृतीला सांभाळण्याची जबाबदारी आतां तुझ्यावरच आहे, हें लक्षांत ठेव. अन् अन्......–कण्वाने शकुंतलेला केलेल्या उपदेशाप्रमाणें लक्ष्मणानेंहि भराभर उपदेशाचे अनेक घुटके पाजले.

तिला या वेळीं औषधाची मात्रा नको होती. अंतःकरणाच्या कुपींतून निघालेला 'उर्मिले, चल माझ्याबरोबर' हा एकच अमृतबिंदु तिला हवा होता.

— मी येणार वनवासाला. येऊं ना ? — उर्मिलेनें करवेल तेवढा करुण-स्वर करून प्रश्न केला

— वनवासाला ? छे: ! वेडी कुठली ! — असल्या गोष्टी आमच्यासारख्या असामान्य व्यक्तींच्या हातूनच व्हावयाच्या अशा भावनेनें लक्ष्मण उत्तरला.

— असं काय बरं ! न्यावं ना मला ?

— वनवासाला जायचं म्हणजे माहेरीं जायचं असं वाटलं की काय तुला ?

थट्टेच्या वायुलहरी प्रसन्न अंतःकरणाच्या मलयाचलावरून आलेल्या असल्या तरच त्या सुखावह होतात. या थट्टेनें खाजकुइलीचें पान अंगाला लावल्यासारखें झाले तिला.

— भलत्याच वेळीं अशी थट्टा करूं नये गडे !

— थट्टा करूं नको तर काय करूं ? देवी, वनवासांतल्या हाल-अपेष्टाची अन् प्राणसंकटाची तुला कल्पना तरी आहे का ? सुकुमार फूल तूं...

— मग देवानं सदैव मस्तकीं धारण करावं त्याला. नाहीं तर विर-हाच्या निखाऱ्यांत जळून जाईल ते !

— छे छे, इथल्यापेक्षां वनातच त्याला जास्त भीति आहे.

— मग सीतादेवींना का बरं नेतात युवराज ?

— सीतादेवींची योग्यता निराळी आहे.

लक्ष्मणाच्या हातून नकळत दुसरा प्रहार झाला उर्मिलेच्या हृदया-वर ! — आपल्या वज्रबाहूंचा आश्रय असला तर मीसुद्धां कृतान्तालाहि भिणार नाहीं.

— माझे बाहू रिकामे नाहींत; रामकार्यांत ते गुंतलेले असणार!

— निदान कृपादृष्टि तरी—

— नाहीं. माझी दृष्टि सीतादेवीवर कोणतेंहि संकट येऊं नये, म्हणून तिच्या भोंवती चौफेर फिरत राहील.

— त्यांतच माझाहि समावेश नाहीं का होणार?

— अशक्य! दोन होड्यांवर पाय ठेवणारा नदींत बुडतो. दोन घरचा पाहुणा उपाशीं मरतो. उर्मिले, तुला एकच सांगतो; ज्या कृत्यानें रामसेवेंत अंतराय घडेल तें कृत्य मी कालत्रयींहि करणार नाहीं. मी एकनिष्ठ रामसेवक आहें, हें तूं केव्हांहि विसरूं नको.

उर्मिलेचा आशावृक्ष मुळासकट उन्मळून पडला. चौदा वर्षें आपणाला हें एकटं, नीरस, निस्सत्व असं जीवन कंठावं लागणार या भीतीनें तिचें सर्वांग थरारलें. एवढा वेळ दाबून धरलेला अश्रूंचा पूर खळखळून बाहेर पडला. असहाय होऊन तिनें लक्ष्मणाच्या गळयाला मिठी मारली.

कधींहि न पाहिलेली उर्मिलेची ती म्लान मुद्रा अन् ते दीनवाणे डोळे पाहून लक्ष्मणाच्या मनाला व्यथा उत्पन्न झाली. तोहि व्याकुळ दृष्टीनें तिच्या मुखाकडे पाहूं लागला. उर्मिलेच्या मनोवेदनांशीं तोहि समरस झाला. 'खरेंच किती मी निर्घृण, माझ्याशीं तन्मय तदाकार झालेल्या या जीवाला दूर ढकलून मी चालता होऊं? न्यावी का हिलाहि बरोबर?' लक्ष्मणाचें चित्त क्षणभर द्विधा झालें.

प्रेमभरानें त्यानें तिचे अश्रु पुसले. एकवार हिला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरावं अन् एक क्षण तरी दोन हृदयें एकजीव करून परमोच्च सुखाचा अनुभव घ्यावा, अशी लक्ष्मणाला इच्छा उत्पन्न झाली. पण—

— लक्ष्मणा! अरे लक्ष्मणा !— रामचंद्रांची हाक लक्ष्मणाच्या कानीं आली. बंधूच्या हाकेनें पत्नीच्या हृदयाच्या हाकेवर विजय मिळवला. 'उर्मिले, येतों हं येतों...उर्मिले' क्षणाचा विलंब न करतां लक्ष्मण बाहेर निघून गेला.

× × ×

राम–सीता–लक्ष्मण त्रिवर्ग राजवाड्यांतून बाहेर पडले. कौसल्या–दशरथांचा शोकस्वर गगन भेदून जाऊं लागला. राजपरिवारात एकच आक्रात ओढवला. प्राण निघून गेलेल्या कुडीसारखी त्या राजप्रासादाला अवदशा आली. बाहेर उभे राहिलेले लोक अश्रु ढाळीत रामाच्या मागून जाऊं लागले.

उर्मिला सौधावर उभी होती. एकवार तरी ते दोन डोळे मागें वळतील अशी तिची आशा होती. पण आशा अन् सिद्धि या बहुधा सवतीच्या नात्यानेंच वागलेल्या दिसतात व्यवहारांत.

हळू हळू तिचा जीवनाधार तिच्या दृष्टीआड झाला. तिच्या डोळ्यांपुढें अंधार आला अन् त्या अंधारांत 'चौदा वर्षें !' हीं अक्षरें विजेच्या तेजानें तळपलीं.

आयोध्येंत ज्याच्या त्याच्या तोंडांतून शब्द निघत होते, 'सीता ! खरी त्यागदेवता साध्वी ती. साऱ्या राजवैभवावर लाथ मारून पतीबरोबर वनवासाला निघून गेली.'

अन् उर्मिला ?...तिच्या त्यागाला कांहींच मूल्य नव्हतें कां ?

असेल ! पण जें भडक असेल तेंच जगाच्या नजरेंत भरतें !!

---

# अद्भुत शांति

उपाध्येबुवाच्या घरीं दुपारी दोन वाजल्यापासून जो पत्त्यांचा अड्डा बसे तो संध्याकाळीं दिवेलागणीपर्यंत.

सहा जण बसून तीनशेचाराचा डाव खेळत. खेळाबरोबरच धूम्रपानहि अखंडित चाले. सभोंवती चंच्या सुटलेल्या असत. लालभडक मुखरसाच्या धारा खिडकीच्या गजांना स्नान घालीत पलीकडच्या कौलावर पडत. त्याच्या पाठोपाठ पानतंबाकूचे चोथे अन् विड्यांचीं थोटकेहि अर्जुनाच्या सव्यसाची नेमबाजीनें खिडकीतून बाहेर जात. 'फट्फट्' असा पत्त्यांचा आवाज एकसारखा कानावर आदळे. एक उठला, कीं दुसरा लगेच त्याची जागा भरून काढी. आरडाओरड अन् हास्यकल्लोळही भरपूर उठे.

अव्याहत असा क्रम चालला होता त्या घरांत; जसें कांहीं नवचंडीचें अनुष्ठानच.

ही खेळाडू मंडळी म्हणजे उपाध्येबुवांकडचा ब्राह्मणवर्ग. उपाध्येबुवा त्या सगळ्या गांवाचे पुरोहित होते. एवढें सगळें यजमानकृत्य त्यांना एकट्याला झेपण्यासारखें नसल्यामुळें त्यांनीं पाचसहा ब्राह्मण आपल्या पदरीं बाळगले होते.

सकाळच्या वेळीं भिक्षुकी, दुपारीं उपाध्येबुवांकडे जेवण अन् संध्याकाळीं पत्ते कुटणें, एवढेंच त्या भिक्षुकांचें त्रिविधकार्य अगदीं ठरून गेल्यासारखें झालें होतें.

आजच्या खेळाला तर विशेषच रंग चढला होता. कारण आज प्रत्यक्ष उपाध्येबुवा खेळायला बसले होते. उपाध्येबुवा खेळत चांगले. त्यांची पानें वांटण्याची चलाखी, भिरभिरवून पान टाकण्याची लकब, 'मारीन नाहीतर मरेन' या वीरावेशानें डावाकडे पहाण्याची त्यांची गंभीर दृष्टी अन् जोरांत पान मारतांनाचा तो त्यांचा रुबाब या गोष्टी बाजूला बसून खेळ पाहाणाऱ्यांच्या मनांत त्यांच्या क्रीडाकौशल्याबद्दल कौतुक निर्माण करीत.

अवघ्या अर्धा तासांत त्यांनीं विरुद्ध बाजूवर दोन गेमा चढवल्या. अजूनही त्यांना खेळायची हौस होतीच.

पण हौसेला मोल नसलें तरी विघ्नें असतातच ना!

'माझे अडचिर्शे' असें म्हणायला अन् एक पोक्तसे गृहस्थ माडीवर यायला एकच गांठ पडली.

— या जगूशेट, बसा.— हातांतले पत्ते खालीं टाकून उपाध्येबुवानीं त्यांना आपल्याजवळ बसायला जागा करून दिली.

श्रीमंत माणसाचा आदरसत्कार करायला कांहीं शिकवायला नको कोणाला. जगूशेटच्या कोटाची कॉलर फाटकी असली, त्यांच्या

डोक्याच्या रुमालाची मच्छरदाणी झालेली असली अन् तांबड्या मातीचीं पुटें चढून धोतराचा पापड झालेला असला तरी हें कुळ चांगलें तळदार आहे हें उपाध्येबुवांना ठाऊक होतें. बरेच दिवस उपाध्येबुवांचा त्यांच्यावर डोळा होता. गृहस्थ मनानें साधा पण हाताचा भारी चिकट. त्यांच्या घरीं कोणतेंहि एखादें मोठें कार्य निघेल अन् आपल्याला घबाडमुहूर्त लाभेल अशी बरेच दिवस त्यांनीं आशा धरली होती. पण अद्यापि ती सफल होण्याचा योग नव्हता. त्याच्या दुसऱ्या बायकोचें क्रियाकर्मांतर केल्यावेळीं जरी उपाध्येबुवांना सांगण्यासारखा फायदा झाला नव्हता तरी जगूशेटच्या तिसऱ्या लग्नाच्या सुखसोहळयांत आपण मागची सगळी भरपाई करून घेऊं असा त्यांनीं निश्चय ठरवला होता. पण तें लग्न झालें गिरी वेंकोबाला. जगूशेट वाजत गाजत वरात घेऊन गांवांत आले त्यावेळीं उपाध्येबुवांची मुद्रा पहाण्यालायक झाली होती. हरताळका, गणेशचतुर्थी, तुळशीचें लग्न वगैरे नैमित्तिक कृत्यांसाठीं त्यांच्या घरीं जाणारा ब्राह्मण नेहमीं कुरकुरत घरीं यायचा. शेजारच्या घरीं चार आणे दक्षणा तर जगूशेटच्या घरीं दोन आणे हातावर पडत ब्राह्मणाच्या. आणि जगूशेटच्या भाविक, श्रद्धाळु मनाचें समाधान होईल अशा रीतीनें सांगोपांग पूजा सांगायला वेळ मोडायचा दुप्पट.

यजमानांनीं आपल्याजवळ चिक्कुपणा करणें हें उपाध्येबुवांना मुळींच आवडत नसे. 'शतेषु जायते शूरः......दाता भवति वा न वा' अशीं चेतावणीचीं भाषणें ते आपल्या यजमानांपुढें वेळोवेळीं करीत. आतांहि जगूशेटपुढें काय बोलावें, कसें बोलावें याची जुळणी ते आपल्या मनाशीं करीत होते. जगूशेटबद्दल अजून त्यांची आशा

खचली नव्हती. एक दिवस तरी यांना चांगलं गंडवायचं हा निर्धार अजूनहि त्यांच्या अंतरांत जागृत होता.

— कसं काय? क्षेम आहेना?— उपाध्येबुवांनीं स्मितपूर्वक विचारलें.

— आपल्या आशिर्वादानं ठीक चाललं आहे.—जगूशेटनीं आदर-भरानें उत्तर दिलें.

उपाध्येबुवांनीं आपली चंची सोडली. धारदार आडकित्यानें ओल्या सुपारीचा कीस करून जगूशेटच्या हातावर ठेवला अन् पानाचा डबा पुढें केला. पानसुपारी अन् वरती तंबाकूची चिमुट अलगद तोंडांत टाकून अर्धवट बोबड्या शब्दांत ते पुढें म्हणाले,

— किंनिमित्तं आगमनं?— उपाध्येबुवांना मधूनच एखादें संस्कृत वाक्य उच्चारून आपल्या विद्वत्तेची दुसऱ्यावर छाप टाकायची संवय होती.

— आपल्याकडेच आलों होतों. उद्यां आमच्या वडिलांचं श्राद्ध आहे. तेव्हां कोणीतरी भटजी पाठवा हें सांगायला आलों होतों. वास्तविक आपणच यावं अशी माझी अपेक्षा होती. पण असल्या क्षुल्लक कारणा-साठीं आपल्याला त्रास द्यायचा हें बरं नाहीं वाटत मनाला....

या बोलण्यांतला गर्भित अर्थ उपाध्येबुवांना न सांगतांच कळण्या-सारखा होता.

— बरं आहे. ब्राह्मण पाठवतों.— ते म्हणाले.

— बरं तर. निरोप घेतों आपला.—असें म्हणून जगूशेट सर्वांना नमस्कार करून निघून गेले.

— काय, आहे कीं नाहीं इरसाल प्राणी?—तिथल्या मंडळीपैकीं एकटा म्हणाला.

वैश्यांच्या जातींत इतका चिकट माणूस दुसरा नाहीं पाहिला बुवा आपण. दिसतो कसा भिकाऱ्यासारखा पाहिलात ना?—दुसऱ्यानें मल्लिनाथी केली.

— त्याचं जाऊं दे रे. पण त्याची हिंकूण्वंती (पत्नी या अर्थी भटजींच्या वैदिक कोशांतला संकेतशब्द) कशी आहे पाहिली नाहींस तूं? 'मध्ये क्षामा चकित हरिणी प्रेक्षणा निम्ननाभिः। श्रोणी भारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्यां......' पैलूदार चमकतं रत्न आहे नुसतं. अन् तें या कावळ्याच्या गळ्यांत पडलं आहे. आपण तर बुवा 'लक्ष प्रदक्षणा नि पैसा दक्षणा' मिळाली तरी त्याच्याकडे जायला खूष आहोंत. 'नयनसुखं को निवारयति?'—भिकूशास्त्र्यांनीं डोळे मिचकावून तिमजली हास्य करीत शेजारीं बसलेल्या भटजींच्या मांडीवर थापटी मारली.

— चलरे, चावटपणा काय चालवला आहेस?—उपाध्येबुवांनीं संभावितपणें त्याला दटावलें.

आणि नंतर जगूशेटकडे श्राद्ध चालवायला कोणी जायचें, दक्षणा कमी दिली तर काय करावयाचें यांविषयीं कुजबुजल्या भाषेंत कांहीं खलबत करून ती बैठक उठली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अकरा वाजतां बंडू भटजी कपाळीं भस्माचे त्रिपुंड्र चर्चन करून, अंगावर उपरणें नि हातांत दर्भाची जुडी घेऊन जगूशेटच्या घरीं प्रविष्ट झाले.

जगूशेट आंघोळ करून बायकोनें निऱ्या करून दिलेलें सोवळ्यांतलें धोतर नेसून पाटावर बसले. भटजींनीं आडवे उभे दोन पाट

ठेवून त्यांच्यापुढें केळीच्या फाळक्यावर दोन चट मांडले. बरीचचीं सव्यापसव्यें अन् उठाबशा जगूशेटनां करायला लावल्यावर पिंडप्रदान सुरू झालें. पूजा आणि नैवेद्य होतांच भटजी म्हणाले,

— पिंडापुढें दक्षणा ठेवावी ऽऽ!

जगूशेटनीं कडोसगीची अधेली काढून पुढें ठेवली.

त्यासरशीं भटजीचें मंत्र म्हणणारें तोंड एकंदम बंद पडलें.

— हं. चालूं द्या पुढें. गप्प कां राहिलांत?—जगूशेट म्हणाले.

— आणखी आठ आणे आले पाहिजेत.

— कां म्हणून!

— पिंढापुढची दक्षणा एक रुपया ठरलेली आहे.

— पण मी दरवर्षी आठच आणे देत असतो. वाडवडिलांपासून आमच्या किर्दीवर श्राद्धाची दक्षणा आठ आणे बार झालेली आहे. घराण्याचा पूर्वापार चालत आलेला शिरस्ता मी मोडणार नाहीं.

— मी पण एक रुपायाच्या खालीं दक्षणा घेणार नाहीं, तुमच्या बापाचं श्राद्ध मी फुकट केलं असं समजेन.

बंडू भटजी 'एष राजन् गतोऽस्मि' अशा अभिनिवेशानें तिथून तडक बाहेर पडले.

— भटजी, असं करूं नका. दक्षणा घेऊन जा. हें बरं नव्हे. उपाध्येबुवा तुमच्यावर रागावतील.....—जगूशेट पडवीवर उभे राहून मोठमोठ्यांदा ओरडत होते.

पण बंडू भटजींनीं एकदां पाठ दाखविली ती दाखविलीच.

जगूशेट अस्वस्थ झाले या प्रकारानें. त्यांची बायकोहि माजघरांत

बसून गंगायमुना वाहूं लागली. वडिलांच्या श्राद्धप्रसंगीं असा प्रकार झाला हें बरें झालें नाहीं, असें त्यांचे मन त्यांना खाऊं लागलें.

थोडा वेळ असा व्यग्रतेनें घालवल्यावर काहींतरी विचार ठरवून ते उठले. अंगांत सदरा अन् डोक्याला रुमाल बांधून आणि पिंडापुढची ती अधेली कडोसरीला लावून ते बाहेर पडले.

उपाध्येबुवांच्या घरीं जाऊन त्यांच्या देखत बंडूभटाची खरडपट्टी काढावी आणि त्यानें टाकलेली दक्षणा उपाध्येबुवांच्या हातावर ठेऊन असले स्वार्थी उन्मत्त ब्राह्मण घरीं बाळगूं नका असें त्यांना सुनावून घरीं यावें या हेतूनें त्यांनीं उपाध्येबुवांचें घर गांठलें.

उपाध्येबुवा नुकतेच जेवून बाहेर आले होते अन् 'अगस्त्यं कुंभकर्णंच....' हा मंत्र म्हणून आपल्या तुंदिल पोटावर हात फिरवीत बसले होते.

— या जगूशेट. ऐन उन्हाचे आलांत. काय भयंकर उन्हाळा हा !

खरीच गोष्ट होती ती. जगूशेटच्या जिवाचा उन्हाळा झालाच होता आज !

— असला उर्मट भट कशाला पाठवलांत आमच्याकडे !—जगूशेटनीं क्रुद्ध स्वरांत विचारलें.

— काय झालं ? आधीं खालीं तरी बसा. अग बने, तांब्याभर पाणी अन् गुळाचा खडा बाहेर घेऊन ये बरं. पाणी घरांतलं आणूं नको. विहिरीचं ताजं गारेगार काढून आण.

पण जगूशेटच्या अंतरांत चवताळलेला महारुद्र यावेळीं गार पाण्याच्या अभिषेकानें शांत होण्यासारखा नव्हता.

— त्या बंडूभटाला माझ्याकडे धाडलंत ते आणखी दुसरे भटजी नव्हते का तुमच्याकडे ?

— असं झालं तरी काय ? काय केलं बंडूभटानं ?

— दक्षणा टाकून आला. त्यालाच विचारा.

उपाध्येबुवांनीं आपल्या होन्ही कानावर हात ठेवले.

— बोलूं नका. असलं कांहींतरी अवाच्य बोलूं नका. माझ्यानं ऐकवत नाहीं हें...! म्हणतां तरी काय ? बंडूभट दक्षणा टाकून आला ! खरंच ?

— मी खोटं कशाला सागूं ?

उपाध्येबुवांनीं आपली मुद्रा शक्य तितकी गंभीर केली, डोळ्यांत पराकाष्ठेची सहानुभूति आणली अन् जगूशेटला ऐकूं जाईल एवढ्या स्वरांत ते आत्मगत पुटपुटले,—शांतं पापम् ! इडापिडा टळो ! !

थोडा वेळ दोघेहि स्तब्ध होते. शेवटीं उपाध्येबुवांनीं पुन्हा विचारलें,

— खरंच, भटजी दक्षणा टाकून आले ?

— खोटं बोललों तर जीभ झडेल माझी !—जगूशेट क्रोधावेशानें गरजले.

— अरेरे ! !— उपाध्येबुवाच्या तोंडून खेदोद्गार निघाला.

उपाध्येबुवांच्या या चमत्कारिक बोलण्याचा नि उद्गारांचा अर्थ न कळल्यामुळें जगूशेटचा अर्धा आवेश थंड झाला. ही कांहीं तरी नवीनच भानगड निघाली कीं काय अशा भयद जिज्ञासेनें त्यांनीं विचारलें,

— काय झालं ? असे एकदम गंभीर कां झालांत तुम्ही ?

— जगूशेट, तुम्ही आमचे यजमान. नंदाच्या गोकुळासारखं तुमचं नांदतं घर. आल्या गेल्याला तांब्याभर पाणी आणि घासभर अन्न

तुमच्याच घरीं आजवर मिळत आलं. परमेश्वराची इच्छा काय आहे कोणास ठाऊक ! 'भयकृद्भयनाशन:' असली त्याची अघटित करणी ! —उपाध्येबुवांचा शब्द घोगरा झाला अन् हळूच त्यांनीं आपल्या खांद्या-वरचा पंचा डोळयाला लावून काढला.

— उपाध्येबुवा, काय आहे तें मला स्पष्ट सांगा. माझा संशय वाढवूं नका !

— काय सांगूं कपाळ !—असें म्हणून उपाध्येबुवांनीं दुखणार नाहीं इतक्या बेतानें आपल्या कपाळावर हात मारला अन् शून्य दृष्टीनें ते आढ्याकडे पाहूं लागले.

— सांगा ना काय तें ? असा अंत कशाला पहातां माझा ? जगू-शेठ अगदीं जिकिरीस आले.

— काय झालं ? आजवर कधीं कोणी 'ऐकिलें ना देखिलें' तसलं झालं. तुम्ही कधीं ऐकलं आहे का भट श्राद्धाची दक्षणा टाकून गेलेला ? बंडू भटाचा अपराध नव्हे तो. ती ईश्वराची प्रेरणा. भावी अशुभाचं सूचक चिन्ह. जगूशेठ, तुमच्या घरांत हें अद्भुत झालं बरं अद्भुत ! उपाध्येबुवा एकदम स्तब्ध झाले.

— अद्भुत म्हणजे काय महा अद्भुत !— दुसऱ्या एका भटजीनें तोंड उघडलें.

— विस्मयोद्भुतमाश्चर्यम्......एकानें अवचित आठवलेला अमर-कोशांतला चरण दडपून दिला.

— 'दारुणं कठिनं चास्य महद्दुःखं भविष्यति'—भिकूशास्त्री आधारवचन बोलले.

अनेकांच्या तोंडून अनेक शास्त्रार्थ गारांसारखे वर्षूं लागले. अन् बिचारे जगूशेट त्यांच्या मारानें अर्धमेले झाले.

आपल्या दोन दिवंगत बायकांच्या मृत्युशय्या त्यांना दिसूं लागल्या. पाठोपाठ नव्या पत्नीचें मुखमंडल दिसलें. त्यांच्या हृदयाला चरका बसला. आपलीं मुलें, घरदार, पैसा, जीवित, हीं जणूं काय धरणीकंपांत सांपडलीं आहेत असें त्यांना वाटूं लागलें. अशुभाच्या शंकेचें बीज एकदां रुजलें, कीं त्याचा वेलविस्तार व्हायला क्षणाचाहि अवधि लागत नाहीं. जगूशेटचे प्राण गुदमरायची वेळ आली अगदीं. त्यांनीं उत्कंठेनें विचारलें,

— या अद्भुताचा परिहार व्हायला कांहीं उपाय नाहीं का ?

— उपाय नसायला काय झालं ? एका मरणावांचून सगळ्यावर उपाय असतो. पण तो फुकट होत नाहीं. त्याला थोडा पैसा खर्चायची तयारी लागते.— उपाध्येबुवा सांत्वनपर शब्दांत म्हणाले.

— बोला काय उपाय तो. मी करायला तयार आहें.

— 'अद्भुत शांति !' शास्त्रोक्त विधान.—उपाध्ये बोलले.

— तो केल्यानं तरी सर्व अरिष्टाचा परिहार होईल का ?

— अलबत् ? का नाहीं होणार ? शास्त्र काय खोटं आहे ? मी छातीला हात लावून सांगतों होईल म्हणून. मात्र रोग जितका दुःसाध्य तितकंच औषधहि तीव्र पाहिजे. हं ऽऽ! 'यथा यक्षस्तथा बलिः'

— काय खर्च येईल ?

— यादीच देतों करून तुम्हाला. उद्यांच्या उद्यां उरकून टाका. सगळं अमंगल, अभद्र जें कांहीं असेल तें धुऊन जाऊंदे घरांतून—

उपाध्येबुवांच्या या धीरोदात्त वाणीने जगूशेटचें धडधडणारें काळीज जरा स्वस्थ झालें.

'सहदेव भाडळी मत,' 'बोनापार्ट शकुनवंती', 'पालीची कारिका', 'सर्वसंग्रह' वगैरे जाड्या ग्रंथराजांच्या आधारें भिकूशास्त्री नि उपाध्येबुवा या दोघांनीं त्या अद्‌भुत शांतीची यादी तयार केली.

जगूशेटनीं एकवार त्याच्यावर नजर टाकली. व मनांतल्या मनांत रकमेचा हिशेब केला. दीडशे रुपयांच्या घरांत हें प्रकरण जात होतें. जगूशेटच्या डोळ्यांपुढें भर दुपारीं काजवे नाचूं लागले नि जीभ कोरडी पडली.

— याच्यांत कांहीं कमी होण्यासारखं नाहीं का ?—फांशीची शिक्षा झालेल्या अपराध्यानें जन्मठेपीसाठीं तोंड वेंगाडून याचना करावी तशासारखें जगूशेटनीं उपाध्येबुवांना विचारलें.

—छे: छे: छे: ! आतां बोलूं नका अगदीं. केवळ तुमच्याकडे पाहून यादीचं प्रमाण कमी धरलं आहे मी. शास्त्राधारें तंतोतंत करायचं तर तें लांब आहे. यजमानाचं कृत्य कमी खर्चांत जेवढं होईल तेवढं करायचं हा माझा बाणा तुम्हाला ठाऊकच आहे.

एका मणाचें ओझें उचलावें तसा तो यादीचा कागद उचलून जगूशेटनीं आपल्या खिशांत ठेवला.

दुसऱ्या दिवशीं आपल्याकडे जातीनें उपस्थित राहून आपलें हें अद्‌भुत शांतीचें कृत्य यथासांग पार पाडण्याबद्दल उपाध्येबुवांना कळकळीची विनंती करून जगूशेट तिथून बाहेर पडले.

— त्याच वेळीं आणखी आठ आणे मी भटाला दिले असते तर... दीडशें रुपये ! केवढा भयंकर आंकडा हा ? या दीडशें रुपयांत आमच्या तीन पिढ्यांचीं श्राद्धं झालीं असतीं ...' — असलेंच काहींतरी पुटपुटत जगूशेट घरच्या रस्त्याला लागले होते.

---